# नवभारत

डिसेंबर २०११

महाभारताचा विश्वसंचार

भारतीय राज्यव्यवस्थेच्या पुनर्रचनेची दिशा व दृष्टी (पूर्वार्ध)

जागतिक वित्तीय व्यवस्थेत करावयाच्या सुधारणा

एका कवितेची पासष्टी

लज्जागौरीचे शोध की, डॉ. ढेरे यांचा कल्पनाविलास?

अनुक्रमणिका


















नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक 'डी.डी.' 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६५। अंक ३। डिसेंबर २०११
मार्गशीर्ष/पौष शके १९३३
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका








# नवभारत

## डिसेंबर २०११

## अनुक्रमणिका

# महाभारताचा विश्वसंचार

डॉ. सौ. सरोजा भाटे

महाभारत हे एक आर्ष काव्य, आपले राष्ट्रीय काव्य. हे जसे 'महा'भारताचे तसेच विशाल किंवा बृहत्तर भारताचेही काव्य आहे. आता ते विश्वकाव्य म्हणून मान्यता पावलेले, जगाच्या सांस्कृतिक संचिताचा एक भाग म्हणून महत्त्व पावलेले आहे. म्हणूनही भारताने जगाला दिलेली सर्वांत मोठी भेटवस्तू आहे, असे म्हणता येईल. एक लाख श्लोकांचे आकारमान असलेली ही जगातील सर्वांत मोठी वाङ्मयीन कृती आहे. एका मध्यवर्ती कथेभोवती गुंफलेली हजारो उपकथानके, आख्याने आणि उपाख्याने यांचा हा अवाढव्य संसार. मात्र हा संसार कुठेही विस्कटलेला नाही, जरासुद्धा. त्याची एकसंधता, एकरसता आश्चर्यकारक आहे. एक लाख श्लोकांमधून उलगडत जाणारी गोष्ट, प्रासंगिक कथानके, उपदेश, स्तोत्रे आणि वृत्तान्त हे सगळे चापूनचोपून त्या त्या जागेवर पक्के बसवलेले आहे. हजारो वर्षांपासून उभ्या असलेल्या या वाङ्मंदिराचा एकही चिरा ढासळलेला नाही.

महाभारत हे महाकाव्य असले, तरी परंपरा त्याला इतिहास म्हणते; 'पाचवा वेद' असे संबोधून गौरवते. तुम्हा-आम्हाला ही कौरवपांडवांची कथा म्हणून माहीत असते. भगवद्गीतेच्या श्रेष्ठ उपदेशाने भरलेला अमृतकुंभ म्हणून हिंदू धार्मिक मनात त्याला आदराचे स्थान असते. मात्र गेल्या दीडदोन शतकांत महाभारतावर झालेल्या संशोधनाकडे ओझरता दृष्टिक्षेप टाकला तरी, अभ्यासकांच्या विश्वात 'मानवतेची स्मरणगाथा' असेच त्याचे नाव त्याच्या मुखपृष्ठावर कोरलेले दिसते.जागतिक वाङ्मयात अढळपद मिळवलेल्या, प्राचीन भारताच्या या ऐतिहासिक दस्तऐवजात यूरोभारतीय समाजजीवनाचे प्रति-बिंब आढळते, असे अभ्यासक मानतात. एकीकडे मानवी भावभावनांच्या स्पंदनाचा विराट आविष्कार, तर दुसरीकडे मानवाच्या कित्येक शतकांच्या पांडित्याचा, वैदग्ध्याचा, मानसिक, बौद्धिक आणि आध्यात्मिक विचारसंपदेचा झगमगता खजिना अशा व्यामिश्र रूपाने महाभारताने अभ्यासकांना दिपवून टाकले आहे. सामाजिक, राजकीय, आर्थिक, धार्मिक, आध्यात्मिक, सांस्कृतिक अशा मानवी जीवनाच्या सर्व अंगांनी घडवलेला इतिहास एकत्र गुंफलेला, हा ज्ञानविज्ञानाचा अक्षय्य निधी आर्ष कवींच्या प्रतिभेच्या अम्लान सौंदर्याचा चिरंतन स्रोत आहे.

अक्षरवाङ्मय ही तर महाभारताची एक ओळख. त्याने संस्कृतीच्या सर्व अंगांना कवेत घेतले आहे. महाभारत हे एका विद्याकलासंकुलाचे नाव आहे. हजारो वर्षांपासून असंख्य शिल्पे, चित्रे आणि नृत्यनाट्यादी ललित कला अशा रमणीय कलाविष्कारांच्या माध्यमातून हे रसिकांना साद घालत आले आहे. समाजाच्या तळागाळापर्यंत पोचलेले त्याचे झिरपे ग्रामीण समाजातील विविध पंथांच्या देवदेवता आणि त्यांच्याभोवती उभे राहिलेले उत्सव यांमधून प्रकटलेले दिसतात; म्हणून महाभारत हे वाङ्मय, धर्म, तत्त्वज्ञान, कला इ. संस्कृतीच्या सर्व अंगांनी घडविलेले मानवतेचे महान शिल्प आहे.

काही वर्षांपूर्वी पीटर ब्रूकने आंतरराष्ट्रीय मंचावर महाभारत सादर केले, तेव्हा एका अमेरिकन वृत्तपत्रात प्रसिद्ध झालेल्या त्याच्या परीक्षणात असे म्हटले की, अणुयुद्धाच्या भीषण संहारकतेची झळ सर्वसामान्यापर्यंत पोचवण्यासाठी पीटर ब्रुकने याची निवड केली. त्यावर एका अभ्यासकाने आपला अभिप्राय असा दिला आहे की, खरेतर पीटर ब्रूकने वापरलेली संहिता हे महाभारताचे सरळसोट रूप आहे, त्यावर कुठलाही रूपकाचा साज चढवलेला नाही. महाभारताची विश्वात्मकता आणि चिरंतन ताजेपणा हेच पीटर ब्रूकच्या निवडीमागचे कारण आहे. प्रत्येक घराला ही आपली कहाणी वाटते, प्रत्येक युगाला त्यात आपले पडसाद ऐकू येतात.

महाभारत हे गारूड आहे. जो त्याकडे ओढला जातो, तो जन्मभर त्याच्या गुंगीत राहणेच पसंत करतो. कधी त्याला त्यात अभिमन्यूला आवाहन करून कवेत






घेणाऱ्या आणि संपवणाऱ्या चक्रव्यूहाची भयप्रद सावली दिसते, तर कधी विश्वरूपदर्शनाच्या अपूर्व अनुभूतीने तो दिव्य आनंदावर आरूढ होतो.

महाभारत हा इतिहास आहे का? पुरातत्त्वशास्त्रज्ञांनी आजवर केलेल्या उत्खननाचा व संशोधनाचा निष्कर्ष असा आहे की हास्तिनपुर, कौशांबी, इंद्रप्रस्थ इ. महाभारतात उल्लेखलेल्या नगरांच्या आसपास केलेल्या उत्खननावरून इ.पू. ९००च्या आसपास या सर्व ठिकाणी एकाच प्रकारची संस्कृती नांदत होती, असे म्हणता येते. इ. पू. ४थ्या शतकातल्या पाणिनीच्या अष्टाध्यायीसारख्या ग्रंथातल्या काही उल्लेखांवरून कुरुवंशाच्या ऐतिहासिकतेबद्दल अंदाज बांधता येतो. त्यामुळे महाभारतकथेबद्दल सज्जड पुरावा आढळला नाही, तरी कुरुसाम्राज्य आणि त्यातील सत्तासंघर्ष एवढे कथाबीज ऐतिहासिक मानण्यास प्रत्यवाय नाही. आणि मग ही 'युद्धस्य कथा रम्या' मागच्या पिढीने पुढच्या पिढीला सांगितली. ही 'जय'गाथा पोवाड्यातून गाणारे गायक घरोघर जाऊन लोकांचे मनोरंजन करू लागले; गाता गाता आणखी गोष्टींची भार घालून ती खुलवू लागले, फुलवू लागले. गोष्टीने गोष्ट वाढत गेली, तिने बाळसे धरले. एका गोष्टीच्या बीजातून अनेक गोष्टींची झाडे उगवली; त्यांचे घनदाट जंगल झाले. जनसामान्याला एकत्र बांधून ठेवणाऱ्या या मनोरंजक गोष्टींच्या जंगलात धर्माच्या, नीतितत्त्वांच्या उपदेशकांनी आपले डेरे टाकले. कथावगुंठित उपदेशाची भरघोस फळे या जंगलातल्या झाडाझाडाला लगडली. अशा तऱ्हेने खुद्द महाभारतात सांगितल्याप्रमाणे हा व्यासांनी सांगितलेला 'जय नावाचा इतिहास' होता, त्यात वैशंपायनांनी आख्यानांची भर घालून त्याचे 'भारत' केले आणि हे भारत शौनकऋषींच्या आश्रमात जमलेल्या ऋषिसमुदायाला ऐकवताना त्यात आणखी उपाख्यानांची, तत्त्वचिंतनाची भर घालून उग्रश्रवा सौतीने त्याला महाभारताचे रूप दिले.

ही कथा घडली उत्तरभारताच्या भूमीवर. इंद्रप्रस्थ, हास्तिनपूर, कुरुक्षेत्र वगैरे नगरांच्या परिसरात. ही वीरगाथा गाणारे गायक मजल दरमजल करीत दशदिशांच्या कानाकोपऱ्यांत पोचले. इसवी सनाच्या प्रारंभीच ही शतसाहस्री संहिता जनमानसात स्थिरावली. केवळ आर्यावर्तातच नव्हे, तर विंध्य पर्वताच्या सीमा ओलांडून तिने दक्षिणापथ काबीज केला, अगदी कन्याकुमारीपर्यंत. लोकमुखातून भारतभर वाहणारी ही भारतगंगा घरोघर पोचली, तेव्हा प्रत्येक उंबरा ही आपली कथा म्हणून रंगवून शेजाऱ्यापाजाऱ्यांना सांगू लागला. एका महाभारताची असंख्य महाभारते झाली आणि त्यांच्या गर्दीत मूळ पुरुष हरवला तो कायमचा; अक्षय्यवटाच्या मूळ पुरुषासारखा. हजारो मुखांनी वाहणाऱ्या या अक्षरगंगेला लिप्यांचे घाट बांधले गेले, तेव्हा ती हस्तलिखितांमधून प्रकटली प्रत्यक्ष रूपात. काश्मीरमधल्या शारदा लिपीपासून तामिळनाडूमधल्या ग्रंथलिपीपर्यंत, पूर्वेच्या नेपाळी, मैथिलीपासून देवनागरीपर्यंत अनेक लिप्यांनी तिची चिरेबंदी कोरीव मंदिरे बांधली. हिंदू देवालयांतून महाभारताची धर्मग्रंथ म्हणून प्रतिष्ठापना झाली. मंदिरांची शिल्पे आणि भिंतींवरची चित्रे ही वीरगाथा सांगू लागली. कीर्तनकार ती आळवण्यात आणि सामान्यजन तिचे श्रवण करून पुण्य संपादन करण्यात धन्यता मानू लागले. महाभारताची संहिता जिथे जिथे पोचली, तिथे तिथे तिने वेगळ्या परंपरा जन्माला घातल्या. देश आणि काल यांमधून सरकणाऱ्या या आर्ष कथेत लोकसंस्कृतीचे रंग मिसळले आणि त्यामुळे ती भिन्न भिन्न ठिकाणी भिन्न भिन्न रूपांत प्रकटली आणि स्थिरावली. महाभारताचे प्रादेशिक अवतार पाहणे हाही एक मनोरंजक अनुभव आहे. वानगीदाखल एक उदाहरण पाहू.

तमिळ राज्यात महाभारताचा धागा तमिळ संस्कृतीच्या गोफात इसवी सनाच्या तिसऱ्या-चौथ्या शतकांपासून गुंफलेला दिसतो. महाबलीपुरम् येथील पाचपांडवरथमंदिराचे शिल्प या वीरगाथेचे चिरंतन प्रतीक आहे. याहून लक्षणीय प्रतीक म्हणजे द्रौपदीअम्मा आणि कुंतीअम्मा यांची देवळे, आणि त्यांचे उत्सव. मूळ महाभारतकथेत क्वचितच उल्लेखलेल्या, कधीकधी तर नसलेल्यासुद्धा व्यक्तींच्या भोवती गुंफलेल्या गोष्टी आणि त्यांच्या नावे भरणारे उत्सव यांनी तमिळ लोकसंस्कृती समृद्ध झाली आहे. अर्जुनाला उलुपी या नागकन्येपासून झालेल्या अरवन नावाच्या मुलाचा केवळ नामनिर्देश महाभारतात आहे. तमिळ लोककथेत तो नपुंसक समाजाची देवता आहे. तिथल्या लोकसंस्कृतीत बहरलेली अल्लीराणीची गोष्ट

अनुक्रमणिका

महाभारतकथेला जोडून त्यातून एक नवी लोककथा जन्माला घातली आहे. अल्लीच्या शौर्याची कवने अजूनही गायली जातात. पांड्य राजाची ही राजकन्या बालपणापासून मुलासारखी वाढली. मात्र तिला पुरुषजातीचा तिटकारा होता. वयात आल्यावर लढाईत मोठा पराक्रम गाजवून ती सिंहासनावर बसली. तीर्थयात्रेच्या निमित्ताने तिथे आलेल्या अर्जुनाला तिच्या सौंदर्याची आणि शौर्याची ख्याती ऐकल्यावर तिची अभिलाषा उत्पन्न झाली आणि श्रीकृष्णाच्या सल्ल्यानुसार डावपेच लढवून शेवटी त्याने तिला मिळवले. एका अभ्यासकाच्या मते स्त्रीचा महिमा गाणाऱ्या मूळ लोककथेशी महाभारताचा धागा जोडला गेला आणि पुरुषप्रधान संस्कृतीचे, पुरुषवर्चस्वाचे गुणगान करणारा नवा बाज तिच्यावर चढला. महाभारत जेव्हा समाजाच्या तळागाळात पोचले, तेव्हा समाजजीवनाशी एकरूप होताना कधी त्याने लोकसंस्कृतीशी नमते घेतले तर कधी तिच्यावर कुरघोडी केली, असे महाभारताने समृद्ध केलेल्या लोकसंस्कृतीच्या अभ्यासावरून लक्षात येते.

भारत पादाक्रान्त करीत असतानाच महाभारताची विश्वयात्रा सुरू झाली होती. प्राचीन आणि मध्ययुगीन काळात जिथपर्यंत हिंदू साम्राज्य पसरले, त्या सर्व भूमीवर महाभारताने अधिराज्य गाजवले. रामायण आणि महाभारत या दोन आर्षकाव्यांनी आशिया खंडाची संस्कृती घडवली असे म्हटले, तर अतिशयोक्ती ठरणार नाही. आजही ही आर्षकाव्ये आशिया खंडातल्या थायलंड, इंडोनेशिया यांसारख्या राष्ट्रांच्या मर्मबंधातली ठेव आहे; आजही त्यामधल्या कथा वेगवेगळ्या रंगमंचीय आविष्कारांतून सादर केल्या जात असताना गर्दी खेचतात.

महाभारताची ही दिग्विजययात्रा केवळ हिंदू धर्माच्या पालखीत बसून झाली नाही. त्याला सर्वदूर पोचवण्यात बौद्ध धर्माचाही हातभार लागला आहे. किंबहुना, कालक्रमाच्या दृष्टीने पाहिले, तर महाभारताच्या आशिया खंडातल्या अस्तित्वाचे सर्वांत आधीचे ऐतिहासिक पुरावे बौद्ध वाङ्मयात आढळतात. अशाच एका पुराव्यानुसार इ. स. २५१ च्या आसपास कांग सेंग हुई नावाच्या बौद्ध भिक्षूने संस्कृत भाषेमधल्या काही कथांचा चिनी भाषेत अनुवाद केला. त्यात महाभारतातल्या काही कथांचा समावेश आहे. बौद्ध भिक्षूंनी धर्मप्रसारासाठी हिंदू वाङ्मयातल्या कथा रूपांतरित करून वापरल्याची अनेक उदाहरणे आहेत. जातककथांपैकी विधुरपंडितजातक, कट्टाहारीजातक आणि शिबिजातक या कथा मुळातल्या महाभारतकथा आहेत. रामायणातून महाभारतात आलेल्या ऋष्यशृंगाची कथा चिनी भाषेत रूपांतरित झाली, तेव्हा ऋष्यशृंगाचा एकशृंग झाला आणि चीनमधून जपानमध्ये गेल्यावर ही कथा काबुकी नाट्य प्रकारातून सादर केली गेली, असे लोकेशचंद्र या विख्यात विद्वानाचे मत आहे. ऋष्यशृंगाच्या कथेच्या आशियाई प्रवासाची यापुढची मनोरंजक कहाणी त्यांनी सांगितली आहे, ती अशी– स्त्रीसंपर्कात आलेल्या पुरुषाचे तपःसामर्थ्य कसे नष्ट होते, हे दाखवून स्त्रीसंपर्क टाळण्याचा उपदेश करण्यासाठी बौद्धांनी जपानमध्ये काबुकी नाट्यप्रकारातून ही एकशृंगकथा सादर केली. या कथेचे भाषांतर पुढे फ्रेंच भाषेत झाले आणि मध्य युरोपातही या कथेचा प्रसार झाला. ह्यू एन् त्संग या चिनी प्रवाशाच्या प्रवासवृत्तातही गांधार देशातल्या स्वात पर्वताच्या पायथ्याशी एकशृंग ऋषींचा आश्रम होता, असा उल्लेख आहे. जिथे अलीकडेच तालिबान्यांनी मानवतेवर क्रूर अत्याचार केला, तिथे एके काळी हा पवित्र, शांत आश्रम होता – संस्कृतीचे विकृतीत रूपांतर करण्याचे केवढे सामर्थ्य आहे इतिहासात!

चीन, जपानप्रमाणेच मंगोलियातही बौद्ध भिक्षूंनी महाभारत पोचवले. तिथल्या एका बौद्ध मठातल्या वैद्याने सुभाषिरत्ननिधीच्या तिबेटी अनुवादाचा मंगोलियन अनुवाद केला असून त्यात महाभारतकथेचा सारांश आढळतो. कंपूचिया या देशात सुमारे दीड हजार संस्कृत शिलालेख सापडले आहेत. त्यांपैकी ६ व्या शतकातल्या एका शिलालेखात सोमशर्मा नावाच्या ब्राह्मणाने त्रिभुवनेश्वराला महाभारताची पोथी अर्पण केली व दररोज त्याच्या पठणाची व्यवस्था केली, असा उल्लेख आहे. अन्य शिलालेखांतही देवळात महाभारतसंहितेची प्रतिष्ठापना, तिच्या पठणासाठी तज्ज्ञ ब्राह्मणाची नेमणूक, पोथी नष्ट करण्याचा कुणी प्रयत्न केल्यास त्यासाठी उच्चारलेली शापवाणी, तत्कालीन राजेरजवाड्यांचे महाभारतश्रवणात तल्लीन होऊन जाणे इत्यादी उल्लेख आढळतात. हिंदू शासनकर्त्यांच्या काळात महाभारत कंबोडियन संस्कृतीचा अविभाज्य घटक बनले








होते. तिथल्या प्राचीन देवळांच्या आवारात महाभारतातल्या प्रसंगांवर आधारित शिल्पे सापडतात. जगप्रसिद्ध अंगकोर-बटच्या भव्य देवळाच्या एका भिंतीवर ४९ मीटर लांबीच्या शिलापट्टावर महाभारतयुद्धाची गाथा कोरली आहे. जगातला सर्वाधिक लांबीचा, महाभारताची वीरगाथा सांगणारा हा शिलापट्ट भारतात नव्हे, कंपूचियात आहे.

इंडोनेशियन संस्कृतीशीही महाभारत प्राचीन काळा-पासून एकरूप झालेले दिसते. किंबहुना इंडोनेशियन माणसाच्या रक्तात ते जितके भिनले, तितके ते त्याच्या जन्मभूमीतल्या, भारतातल्या माणसाच्या रक्तात भिनले नाही, असेच म्हणावे लागते. इथल्या राजघराण्यांनी कुरु-वंशाशी रक्ताचे नाते जोडले. या देशाचा पहिला ऐतिहासिक राजा जदजन हा परीक्षिताचा मुलगा मानला जातो. इथल्या राजवंशातले काही राजे स्वतःला महाभारतातल्या नायकांचे अवतार मानत. प्राचीन जावानीज वाङ्मयात महाभारत अष्टादशपर्व या नावाने ओळखले जात होते. याखेरीज अर्जुनविवाह, सुभद्राविवाह, अभिमन्यूविवाह, पार्थयान, कृष्णायान अशा कितीतरी सुट्या काव्यांना घेऊन महा-भारताने या राष्ट्राच्या वाङ्मयविश्वात आपला संसार थाटला आहे. इथे मूळ महाभारताच्या कथेला नवे धुमारे फुटलेले दिसतात. काही वेळा मूळ कथानकात बदल केलेलेही दिसतात. क्षितिसुंदरी नावाची, श्रीकृष्णाला रुक्मिणीपासून झालेली कन्या इथे अभिमन्यूची पत्नी आहे. ती रणांगणावर धारातीर्थी पडलेल्या अभिमन्यूबरोबर सती जायला तयार झाली आहे. विराटाच्या श्वेत नावाच्या मुलाला इथे पांडवांचा पहिला सेनापती केले आहे. विराट-पर्वाच्या एका पोथीत ९९६ साली १४ ऑक्टोबर ते १२ नोव्हेंबर या काळात विराटपर्वाचे पारायण झाल्याचा उल्लेख आहे. इंडोनेशियामधल्या वयांग नावाच्या नाट्य-सादरीकरणात महाभारताने चांगलीच लोकप्रियता मिळवली असून आजही त्यावर आधारित छायानाट्याचे प्रयोग गर्दी खेचतात.

बाली, थायलंड या अन्य आशियाई देशांची कथाही थोड्याफार स्वरूपात अशीच आहे. दक्षिणपूर्व आशिया महाभारताने नुसता पादाक्रान्तच केला नाही, तर तिथे त्याची चिरंतन अधिसत्ता आहे.

महाभारताच्या विश्वयात्रेचा पूर्वरंग आपण पाहिला. आता पश्चिमेकडे प्रस्थान ठेवायचे. या आर्षकाव्याने पश्चिमेत पहिले पाऊल टाकले ते हस्तलिखितांच्या रूपात, १९ व्या शतकाच्या आरंभी. मात्र त्यापूर्वी कितीतरी शतके आधी, म्हणजे इसवी सनाच्या प्रारंभाआधी महाभारत गाणारे गायक काफिल्यांबरोबर इजिप्तला पोचले असावेत आणि त्यांनी गायलेल्या भारतकथेचा प्रभाव विख्यात कवी व्हर्जिल यावर पडला असला पाहिजे, असे मत फ्रँकलिन एजर्टन यांनी व्यक्त केले आहे. सभापर्वात रोम या प्राचीन नगराचा रोमा असा उल्लेख आहे; इतकेच नव्हे, तर मध्ययुगीन युरोपियन कथावाङ्मयातील कितीतरी कथा महाभारतकथांवर बेतलेल्या आहेत, असेही मत त्यांनी व्यक्त केले आहे. महाभारताचे दुसरे एक अभ्यासक बी. ए. फान नूटेन यांनी आपल्या पुस्तकात म्हटले आहे की, महाभारतात उल्लखलेले भगदत्त आणि दत्तमित्र म्हणजे अलेक्झांडरने जिंकलेल्या वायव्येकडच्या प्रदेशावर त्याने नेमलेले प्रशासक अपोलोनियस आणि डेमेट्रियस. अलेक्झांडरच्या आक्रमणामुळे भारतीय आणि ग्रीक संस्कृतीत जी देवाणघेवाण झाली, तिचा परिणाम म्हणजे होमरच्या इलियडचा महाभारतकथेवर पडलेला प्रभाव, असे काही ग्रीक अभ्यासकांचे मत; तर अन्य काही विद्वानांचे मत नेमके याउलट. या सर्व मतमतांतरांतून महाभारताने प्राचीन काळी केलेल्या विदेशयात्रेची शक्यता सूचित होते.

१७८५ मध्ये चार्लस् विल्किन्सने भगवद्गीतेचे इंग्रजी भाषांतर इंग्लंडमध्ये प्रसिद्ध केले आणि पाश्चात्त्य जगाला महाभारताची पहिली ओळख झाली. त्यानंतर १७९०मध्ये विल्यम जोन्सचे अभिज्ञानशकुंतलम्‌चे इंग्रजी भाषांतर, त्यापाठोपाठ विल्किन्सचे महाभारतातल्या दुष्यंतशकुंतला-ख्यानाचे भाषांतर व त्यावरून झालेली फ्रेंच, जर्मन भाषांतरे या मार्गाने महाभारत युरोपभर पसरले. या महाकथेची मोहिनी कविमनाच्या अभ्यासकांवर पडली. द्रौपदी आणि पांडवांची कथा रंगवणारे २८७ कडव्यांचे एक काव्य विल्यम जोन्सने १७८५ साली रचले अशी माहिती त्याच्या-वरच्या एका लेखात मिळते. १८१९ च्या सुमारास महा-भारताची हस्तलिखिते जहाजातून प्रवास करीत युरोपच्या किनाऱ्यावर उतरली. फ्रांझ बॉप् या प्राच्यविद्यातज्ज्ञाने त्यांच्या आधारे आपली नलोपाख्यानाची आवृत्ती सिद्ध



अनुक्रमणिका

केली. नलदमयन्तीकथेने पाश्चात्त्य मनाला भुरळ पाडली आणि या कथेची लॅटिन, जर्मन आणि अन्य युरोपियन तसेच रशियन रूपांतरे पाश्चात्त्य विद्यार्थ्यांना महाभारताच्या अभ्यासाकडे आकृष्ट करू लागली. भाषांतरित कथा, आख्याने आणि उपाख्याने यांच्या वाटेने महाभारत पश्चिमेत सर्वदूर पोचले. या तुकड्यातुकड्यांमधून या महाकाव्याच्या अवाढव्यपणाबरोबर त्याच्या संक्रमणातल्या गुंतागुंतीची आणि अनेक आवृत्त्यांमध्ये असलेल्या अस्तित्वाची कल्पना पाश्चात्त्य संशोधकांना आली. परिणामी १८९७ मध्ये पॅरिसमध्ये भरलेल्या आंतरराष्ट्रीय प्राच्यविद्यापरिषदेत मॉरिझ विंटरनिट्झ यांनी महाभारताच्या चिकित्सित संपादित आवृत्तीसाठी संशोधकांना साद घातली. १९०८ साली ल्यूडर्स या जर्मन संशोधकाने ग्योटिंगेन विद्यापीठाच्या आर्थिक साहाय्याने २९ हस्तलिखितांवर आधारलेली, आदिपर्वाच्या ६७ श्लोकांची चिकित्सित संपादित आवृत्ती प्रसिद्ध केली आणि एका महत्त्वाकांक्षी प्रकल्पाची पाया-भरणी झाली. पुढे पहिल्या महायुद्धाचा भडका उडाल्यामुळे युरोपात हे काम थांबले आणि ते थेट पुण्यात भांडारकर संस्थेतील विद्वानांच्या हवाली करण्यात आले, पुढे चालू ठेवण्यासाठी. अवघ्या जगाला शाप ठरलेले महायुद्ध या एका बाबतीत भारताला वरदान ठरले; कारण यातूनच पुढे अनेक विद्वानांच्या ५० वर्षांच्या अथक संशोधनातून महाभारताची चिकित्सित संपादित आवृत्ती भांडारकर संस्थेने प्रकाशित केली. जवळजवळ २० वेगवेगळ्या लिप्यांमध्ये लिहिलेली १२५९ हस्तलिखिते देशाच्या काना-कोपऱ्यांतून गोळा करून त्यांचा तौलनिक अभ्यास करून सिद्ध केलेल्या, १३००० डेमी क्वार्टो आकाराची पृष्ठे आणि १९ खंडांत सामावलेल्या या ग्रंथराजाचे लोकार्पण त्या वेळचे राष्ट्रपती सर्वपल्ली राधाकृष्णन् यांच्या हस्ते दि. २२ सप्टेंबर १९६६ साली करण्यात आले. भांडारकर संस्थेच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहिलेला हा क्षण. मात्र हा क्षण भेटण्यासाठी डॉ. व्ही. एस. सुखटणकर, डॉ. एस. के. बेलवलकर आणि डॉ. पी. एल. वैद्य हे तीन प्रधान संपादक आणि त्यांच्या नेतृत्वाखाली काम करणारे डॉ. एजर्टन, डॉ. दांडेकर यांसारखे दहा दिगंत ख्यातीचे संपादक यांचे परिश्रम, चिकाटी आणि उच्च श्रेणीचे बौद्धिक योगदान कारणीभूत झाले. अशा तऱ्हेने अनेक महाभारतांच्या या अक्षयवटाच्या घनदाट जंगलातून एक भासमान मूळपुरुष शोधून काढायला १८९७ ते १९६६ असा ६९ वर्षांचा कालावधी लागला आणि त्यासाठी अनेक अभ्यासकांनी आपली हयात वेचली. आंतरराष्ट्रीय ख्यातीची ही महाभारताची चिकित्सित संपादित आवृत्ती प्रमाणभूत मानली जाते. या आवृत्तीवर आधारित अनेक-विध संशोधनाचे पैलू उलगडून दाखवण्यासाठी अनेक लेखांचा प्रपंच मांडावा लागेल. त्याचबरोबर सर्व उपलब्ध हस्तलिखितांमधून संक्रमित झालेल्या आवृत्त्यांचा म. सा. वि. काढून सिद्ध केलेली ही चिकित्सित आवृत्ती म्हणजे मूळ महाभारत नसून उलट या सर्व आवृत्तींचा ल. सा. वि. म्हणजे महाभारत असा दृष्टिकोण मांडणाऱ्या संशोधकांचाही एक गट आहे. त्याचा परामर्श घेण्यासाठीही वेगळी लेखमाला सुरू करावी लागेल.

या अवाढव्य ग्रंथाच्या भाषांतराचे प्रकल्प आजही अमेरिका, पॅरिस, इटली, रशिया, जपान इ. राष्ट्रांत चालू आहेत. मात्र संपूर्ण महाभारताचे भाषांतर अभ्यासकांच्या हाती देण्याचे श्रेय पश्चिमेला नव्हे, पूर्वेला द्यावे लागेल. चीनमध्ये १९६० साली सुरू झालेले महा-भारताच्या चिनी अनुवादाचे काम २००५ साली संपले आणि त्याच्या सर्व भाषांतरित प्रती खपल्यासुद्धा! भारतात तर एका अभारतीय भाषेत संपूर्ण महाभारताचे भाषांतर सोळाव्या शतकातच झाले होते आणि ते करवून घेतले होते मुघल सम्राट अकबराने. अनेक मुस्लिम पंडितांच्या सहभागातून आणि हिंदू पंडितांच्या मदतीने पर्शियन भाषेत भाषांतरित झालेल्या महाभारताची एक हस्तलिखित प्रत मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या हस्तलिखित संग्रहात आहे, अशी माहिती उपलब्ध आहे. ज्या ग्रंथाची फलश्रुती खूप संतती, संपत्ती, वैभव आहे, त्याच्या भाषां-तराचे श्रेय आपण का घेऊ नये, या विचाराने प्रवृत्त होऊन अकबराने हे भाषांतर करवून घेतले. ते १५८२ मध्ये पूर्ण झाले. चित्रे आणि नक्षीकामाने सजवून सिद्ध केलेल्या त्याच्या पोथ्यांच्या प्रती अनेक दरबारी सरदारांनीही घेतल्याची नोंद ऐने अकबरीत आहे. शेख सुलतान हाझी याने या भाषांतरावरून शेवटचा हात फिरवला. त्याला एकदा तो काम करीत असताना कुणीरने विचारले, "हे तुम्ही काय करता आहात?" तो म्हणाला, "दहा हजार

वर्षांचे ज्ञान पर्शियन भाषेत आणतोय."

महाभारताच्या विश्वसंचाराची ही एक झलक. आजही या विराट शोभादर्शकाच्या लोलकांचे कोन फिरवून त्यातली प्रतिक्षणी नवे रूप ल्यालेली चित्तवेधक दुनिया न्याहाळण्यात जगभरातले संशोधक दंग आहेत.

☆☆☆

---



अनुक्रमणिका

# भारतीय राज्यव्यवस्थेच्या पुनर्रचनेची दिशा व दृष्टी (पूर्वार्ध)

श्री. बाबूराव चंदावार

**प्रस्तावना :**

भारताच्या सभोवतालची परिस्थिती, भारतांतर्गत परिस्थिती व जागतिक परिस्थिती यांच्या अनुषंगानेच सध्याच्या भारताचे राजकीय स्वरूप व संभाव्य राजकीय स्वरूपही लक्षात घेणे गरजेचे झाले आहे. हा एक बदललेला व बदलत जाणारा नवा संदर्भच म्हणायला हवा! म्हणून, विधानसभेच्या व लोकसभेच्या कोणत्याही निवडणुकांचा नेहमीसारखा पारंपरिक विचार करून चालणार नाही. आणि समजा, नेहमीसारखा पारंपरिक विचार करण्याचाच आग्रह धरला गेल्यास तो भारताच्या लोकशाहीला व भारतीय स्वातंत्र्यालाही हितावह ठरणार नाही.

लोकशाही महत्त्वाचीच असते व आहे. पण, त्याहून जास्त महत्त्वाचे 'स्वातंत्र्य' आहे. कारण, स्वातंत्र्यातली राजकीय व्यवस्था मानूनच संसदीय लोकशाहीचा स्वीकार केला गेला आहे. पण, 'स्वातंत्र्यास्तव स्वीकारली गेलेली लोकशाहीची व्यवस्था' असे स्वरूप मात्र अद्याप भारताच्या लोकशाहीला प्राप्त झालेले नाही. म्हणून, स्वातंत्र्यानंतर पर्यायच उरला नव्हता म्हणून लगेच स्वीकारायला हवी होती म्हणूनच स्वीकारली गेलेली राज्यव्यवस्था म्हणजेच संसदीय लोकशाही, एवढेच याचे महत्त्व होते व हे महत्त्वच कायम स्वरूपी राहिलेले आहे. पण, यामुळे भारतीय लोकशाहीच्या व्यवस्थेला स्वातंत्र्याची जाण ठेवण्याइतपत प्रगल्भता यायला हवी होती, हे जे अपेक्षित होते त्याचेच विस्मरण झालेले असावे, असे वाटते. कारण, लोकशाही व्यवस्थेला स्वातंत्र्याच्या भूमिकेची चाड आहे, असे वाटण्याइतपत बाळसेदारपणा या लोकशाहीच्या संसदीय व्यवस्थेला अद्याप आलेलाच नाही! म्हणून, जी लोकशाही राबवली जाते आहे, ती केवळ संसदीय औपचारिकतेचीच आहे, एवढ्या एकाच अर्थाने स्वतःचे अस्तित्व शिल्लक ठेवून आहे. म्हणून, स्वातंत्र्याच्या संकल्पाला शोभेल असेच ते आहे, असे म्हणता येण्याची परिस्थितीही नाही! यामुळे, संसदीय लोकशाहीतल्या सर्वच निवडणुका ज्या एका नियमाने होत असतात, त्याला स्वातंत्र्याचा उद्देश जडलेला असावा किंवा काय, याची स्पष्टता होत नाही व ही बाब स्वातंत्र्याच्या दृष्टीने काळजी करण्यासारखीच म्हणावी लागेल! तरीही याची जाण बाळगण्याइतपत प्रगल्भता निवडणूक पद्धतीला अद्याप आलेली नसावी, असे म्हणण्यासारखी परिस्थिती झालेली आहे. पण, लोकशाहीला मानणाऱ्यांना व अन्य लोकशाहीच्या आस्थेवाइकांना या बाबतीत काहीच म्हणावयाचे नसावे, असे दिसते. कारण, स्वातंत्र्याचा हेतू सांभाळूनच लोकशाहीचा संसदीय उपचार साधण्याच्या दृष्टीने जी कार्यप्रवणता अपेक्षित असते व आहे, ती लोकशाहीतल्या राजकीय पक्षांमध्ये आहे किंवा काय, हे खरेतर स्पष्ट व्हावयाला हवे आहे! पण, ही केवळ अपेक्षाच होऊन बसलेली आहे. अर्थात यातून अपेक्षापूर्तीची पावले उचलली जातील किंवा उचलली जात आहेत, असे काहीही दृष्टीस पडत नाही.

१

लोकशाही या संकल्पनेकडे अनेक दृष्टींनी पाहिले जाते व म्हणूनच याचे अनेकानेक अर्थ लावले जातात! पण, स्वातंत्र्याच्या भूमिकेचा यांतल्या कोणत्याही अर्थाला स्पर्श झाला आहे, असे मात्र वाटत नाही. कारण, ब्रिटिश साम्राज्यशाहीतूनच लोकशाहीची संकल्पना उदयास आली व जगात विस्तारली आहे, असे ब्रिटिशांबरोबरच भारतातल्या लोकशाही-प्रेमींना वाटत असते. पण, भारतीय स्वातंत्र्याची चळवळ ब्रिटिश साम्राज्यवादाच्या विरोधातच झालेली असल्यामुळे ब्रिटिशांना मान्य अशा लोकशाहीला ब्रिटिश साम्राज्यवादाच्या प्रभावातून वेगळे राहता आले आहे वा राहता येऊ शकले आहे किंवा काय, याविषयी फारसा विचारच केला गेला नसावा, असे वाटते. कारण, ब्रिटिश लोकशाही ही जगातल्या लोकशाहीची जननी आहे (मदर ऑफ डेमॉक्रसी) अशा समजुतीतूनच भारतातल्या लोक-








शाहीचे मूल्यमापन आजवर केले गेले आहे व अद्यापही हेच मूल्यमापन केले जाते आहे. म्हणून, भारताच्या लोकशाहीला स्वतंत्र मूल्य आहे, असे अर्थातच म्हणता येत नाही. पण, स्वातंत्र्य-चळवळीच्या यशातून स्वतंत्र भारताची लोकशाही अस्तित्वात आलेली असल्यामुळे ती स्वतंत्र लोकशाहीच आहे, असा समज करून घेऊनच लोकशाहीवरचे प्रेम भारतात व्यक्त केले जाते आहे. म्हणून, ब्रिटिश साम्राज्यवादाचा संस्कार भारताच्या लोक-शाही-व्यवस्थेला झाला असल्याचा आक्षेप जर लावलाच जात असेल, तर तो अनाठायी आहे, असे म्हणता येणार नाही व म्हणूही नये ! पण, या देशातल्या लोकशाहीचे समर्थक-आस्थेवाईक या आक्षेपाचा स्वीकार करीत नाहीत. कारण, तो स्वीकारण्याजोगाच नाही, असे ते मानतात. यामुळे भारतीय लोकशाहीची व्यवस्था स्वातंत्र्याच्या भूमिकेतलीच आहे, असेच जर कोणी ठरवू पाहत असतील, तर ते वस्तुस्थितीला धरून नाही, असेच शेवटी म्हणावे लागेल ! अर्थात, सध्याच्या भारतीय लोक-शाहीचे जे भ्रष्ट व ओंगळवाणे स्वरूप समोर आलेले दिसते आहे ते स्वातंत्र्याच्या भूमिकेची प्रतारणा करणारेच आहे, असे जर कोणालाही वाटत असेल, तर त्याचा आस्थापूर्वकच विचार करायला हवा. कारण, तथ्यात्मक दृष्ट्या विचार केल्यास भारतीय लोकशाहीचे सध्याचे दिसणारे भ्रष्ट व ओंगळ स्वरूप हे ब्रिटिश साम्राज्यवादात जोपासल्या गेलेल्या सरंजामशाहीच्या संस्कारातलेच आहे, हे सहजच लक्षात येऊ शकते. कारण, याची वस्तुस्थिती कोणत्याच कारणामुळे दृष्टिआड करता येत नाही व दृष्टिआंड करूही नये ! याविषयीचे स्पष्ट संकेत महात्मा गांधींनी १९०७ साली लिहिलेल्या 'हिन्द स्वराज्य' या पुस्तकात दिलेलेच होते. कारण, महात्मा गांधींनी ब्रिटिश पार्लमेंटला 'वेश्या' व 'वांझ' या दोन शब्दांचा वापर करूनच जगासमोर सर्वप्रथम उघडे पाडले होते. या वेळी भारताच्या लोकसभेसाठीही तेच शब्द उपयोगात आणले गेले तर फारसे आक्षेपार्हय मानले जाणारही नाही ! कारण, ब्रिटिश पंतप्रधान पार्लमेंटचा आपल्या मर्जीनुसार उपभोग घेतो व पार्लमेंटवर दबाव आणल्या-शिवाय ती स्वतःच्या प्रेरणेतले निर्णय करूच शकत नाही, हे दोन्ही महात्मा गांधींनी ब्रिटिश पार्लमेंटवर लावलेले आक्षेप या वेळी भारताच्या बाबतीतही लावता येऊ शकतील, अशीच परिस्थिती झालेली दिसते आहे ! तेव्हा, यावर विचार करताना भारतीय लोकशाहीच्या व्यवस्थेचे स्वरूप स्वातंत्र्याच्या भूमिकेशी जुळणारे नाही, हे लक्षात घेता येऊ शकते व घ्यायलाही हवेच ! कारण, हे लक्षात घेतल्याशिवाय लोकशाहीचे स्वरूप स्वातंत्र्याला अनु-सरूनच घडायला हवे आहे, ही केली जाणारी वा केली गेलेली अपेक्षा निरर्थकच ठरू शकते. याचे भान ठेवूनच भारताची राज्यव्यवस्था स्वातंत्र्याच्या भूमिकेला अनुसरूनच ठेवायला हवी, या अपेक्षेनुसार तिचे स्वरूप घडवण्याच्या दिशेने पावले उचलली जाऊ शकतील. अन्यथा भारताची राज्यव्यवस्था स्वातंत्र्याच्या भूमिकेहून वेगळी व निव्वळ स्वैराचाराचीच राहू शकेल. याचा प्रत्यय सध्या येतच आहे व यांतूनच लोकशाहीची म्हणवली गेलेली संसदीय उपचाराची व्यवस्था हिंसक दुष्प्रवृत्ती व फॅसिस्ट दुष्प्रवृत्ती या दोन्हींची कास धरणाऱ्यांची बटिक होऊही शकेल ! अर्थात, हे लक्षात घेऊनच भारतीय राज्यव्यवस्था कशी असावी यावर विचार करायला हवा.

२

सध्याच्या परिस्थितीत आणखी एक बाब लक्षात घ्यायला हवी. ब्रिटिश पार्लमेंटच्या पद्धतीतून जी परंपरा निर्माण केली गेली, त्यातून वृत्तपत्रे व प्रसारणांच्या माध्यमांना लोकशाहीचा चौथा स्तंभ मानले गेले आहे. अलीकडे यात इलेक्ट्रॉनिक प्रसारण माध्यमांची भर पडलेली आहे, ज्यांना न्यूज चॅनल अथवा वृत्तवाहिन्या म्हटले जाते. प्रसारणांच्या माध्यमांना लोकशाहीच्या लोक-शिक्षणासाठी आवश्यकच मानले गेले असल्यामुळे त्यांचे स्वागतच केले गेले आहे, ते करायलाही हवे. पण, राजकीय पक्ष व त्यांच्या युत्यांच्या बाबतीत त्यांच्या राज-कारणी कृत्यांना ते अयोग्य असले तरीही उत्तेजन देण्याचे तंत्र अवलंबले गेले असल्यामुळे जी हीन पातळी राजकीय पक्षांची झालेली दिसते आहे, तीच हीन पातळी प्रसारणांच्या माध्यमांची अथवा वृत्तवाहिन्यांचीही झालेली अलीकडे उघडपणेच दिसते आहे ! म्हणून, कार्पोरेट व औद्योगिक घराणेशाहीच्या व अन्य घातक शक्तींच्या नियंत्रणाखाली गेलेल्यांच्या राजकारणाचा प्रभाव जसा जनमानसावर पडताना दिसत आहे, तसाच प्रभाव प्रसारणांच्या माध्यमांचा








वृत्तवाहिन्यांचाही पडताना दिसते आहे. एका अर्थी प्रसारणांची माध्यमे व वृत्तवाहिन्यांचेही स्वतःचे राजकारण होत आहे व त्यालाही हीन पातळी लाभलेली असावी, हेच त्यांचे स्वरूप पाहताना वाटतेही आहे! अर्थात, कार्पोरेट व औद्योगिक घराण्यांनी वृत्तवाहिन्या व प्रसारणांची माध्यमे स्वतःचे हितसंबंध जपण्यासाठीच चालवल्याचे जाणवत असते व लोकांमध्ये लोकशाहीची जाण वाढण्यासाठी याचा योग्य तो परिणाम होत आहे, असे अर्थातच म्हणता येत नाही आहे! म्हणून, राजकीय खेळीकडे जसे पाहिले जाते आहे, तसेच वृत्तवाहिन्या व प्रसारणांच्या माध्यमांकडेही पाहिले जाते आहे. यातून लोकशाहीच्या चौथ्या स्तंभाची भूमिका वठवलीच जात नसून लोकशाहीच्या चौथ्या स्तंभाची भूमिका म्हणून काही प्रयोजनकारी असू शकते व आहे, या संकल्पनेलाच विकृतावस्था आलेली असावी, असेच म्हणता येऊ शकते आहे!

स्वातंत्र्यपूर्व काळात जवळपास सर्वच प्रसारणांची माध्यमे स्वातंत्र्याच्या भूमिकेला अनुकूल राहिली नव्हती. कारण, ती सर्व व्यावसायिक लाभासाठी चालवली जात होती. म्हणून, त्यांच्याकडून स्वातंत्र्याच्या चळवळीला समर्थन मिळायला हवे याची अपेक्षाही केली जात नव्हती. कारण, ही बहुतेक सर्वच माध्यमे ब्रिटिश साम्राज्याचे आधिपत्य मानणारी होती. हे लक्षात घेऊनच स्वातंत्र्याच्या चळवळीत स्वातंत्र्याचे समाजप्रबोधन करण्यासाठी लोकमान्य टिळकांनी 'केसरी' पत्राची व महात्मा गांधींनी 'हरिजन' पत्राची योजना केली होती. या पत्रांमधूनच स्वातंत्र्याच्या चळवळीचे समाजप्रबोधन केले जात होते. तेव्हा, शासन अथवा कार्पोरेट्स व औद्योगिक घराण्यांच्या नियंत्रणातली प्रसारणांची माध्यमे व वृत्तवाहिन्या लोकशाहीचे समाजप्रबोधन करू शकतील, असे मानले जाऊ नये. कारण, यांच्याकडून समाजप्रबोधन करणे शक्य होणारच नाही, हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे. अर्थात, ब्रिटिश लोकशाहीच्या पद्धतीत प्रसारणांच्या माध्यमांना व वृत्तपत्रांना लोकशाहीच्या चौथ्या स्तंभाचे महत्त्व दिले गेले होते. कारण, ती ब्रिटिश साम्राज्याच्या नियंत्रणातलीच होती; अर्थात, लोकांच्या स्वातंत्र्याची जपणूक करण्याच्या उद्देशातली व त्या पात्रतेची नव्हती. म्हणून, भारतात लोकशाहीच्या चौथ्या स्तंभाचे महत्त्व वृत्तपत्रांना व प्रसारणाच्या माध्यमांना देणे भारतीय स्वातंत्र्याच्या भूमिकेला अनुसरून नसल्यामुळे ते उपयोगाचे नसते व नाही, हे स्पष्टच आहे. उलट, प्रसारणाची माध्यमे स्वातंत्र्याच्या भूमिकेशी निगडित अशा लोकशाहीच्या व्यवस्थेला घातकच ठरतात, हेच सध्या भारतात प्रत्ययाला येत आहे. म्हणून हे निक्षून लक्षात घ्यायला हवे आहे!

३

स्वातंत्र्याला अनुसरूनच भारताच्या राजकीय व्यवस्थेची कल्पना करायला हवी व तशीच राजकीय व्यवस्था अस्तित्वात आणायलाही हवी. पण, भारतातल्या राजकीय पक्षांची भूमिका या बाबतीत संयमित राहिलेली नाही व तशी राहू शकतही नाही, ही एक वस्तुस्थिती आहे. तेव्हा, याचा विचार करताना लोकशाहीत राजकीय पक्षांचे प्रयोजन व उपयुक्ततेविषयी ठाम अशी भूमिका घ्यायला हवी आहे!

या बाबतीत यापूर्वी जो विचार केला गेला होता, तो जाणून घ्यायला हवा. ब्रिटिश लोकशाहीला साम्राज्यवादाचा विळखा पडल्यामुळे स्वातंत्र्याची भूमिका ब्रिटिश लोकशाहीला लाभू शकली नव्हती. म्हणूनच भारतात स्वातंत्र्याची चळवळ करावी लागली होती. पण, १९१७ साली रशियात बोल्शेविक क्रांती घडून आल्यानंतर राजकीय व्यवस्थेची कम्युनिझमप्रेरित जी राज्यव्यवस्था रशियात व चीनच्या क्रांतीनंतर त्या ठिकाणी आली, तिच्या अनुकरणातून अन्य कम्युनिस्ट व समाजवादी राष्ट्रांतूनही ती अस्तित्वात आली! या-सर्वांचा अनुभव लक्षात घेऊनच स्वातंत्र्याला अनुरूप राज्यव्यवस्थेचा विचार जगात केला जाऊ लागला व यातून काही नवी विचारसरणी उदयास आली. त्यातल्या रशियन क्रांतीनंतरच्या परिस्थितीत ज्यांनी नवी राज्यव्यवस्थेची मांडणी करण्याचा प्रयत्न केला होता, त्यात लक्षात घेण्यासारखे एक नाव (स्व.) मानवेन्द्रनाथ रॉय यांचे आहे. मानवेन्द्रनाथ रॉय रशियन क्रांतीची व्यूह रचणाऱ्यांपैकीच एक कॉम्रेड लेनिनचे विश्वासू सहकारी होते. रशियात बोल्शेविक क्रांती घडून आल्यानंतर लेनिनच्या पश्चात स्टॅलिनकडे रशियाची राज्यसूत्रे आल्यावर तो हुकूमशहा झाला व त्याने स्वतःला अनुकूल नसलेल्यांचा नायनाट करण्याचे

शाहीचे मूल्यमापन आजवर केले गेले आहे व अद्यापही हेच मूल्यमापन केले जाते आहे. म्हणून, भारताच्या लोकशाहीला स्वतंत्र मूल्य आहे, असे अर्थातच म्हणता येत नाही. पण, स्वातंत्र्य-चळवळीच्या यशातून स्वतंत्र भारताची लोकशाही अस्तित्वात आलेली असल्यामुळे ती स्वतंत्र लोकशाहीच आहे, असा समज करून घेऊनच लोकशाहीवरचे प्रेम भारतात व्यक्त केले जाते आहे. म्हणून, ब्रिटिश साम्राज्यवादाचा संस्कार भारताच्या लोकशाही-व्यवस्थेला झाला असल्याचा आक्षेप जर लावलाच जात असेल, तर तो अनाठायी आहे, असे म्हणता येणार नाही व म्हणूही नये! पण, या देशातल्या लोकशाहीचे समर्थक-आस्थेवाईक या आक्षेपाचा स्वीकार करीत नाहीत. कारण, तो स्वीकारण्याजोगाच नाही, असे ते मानतात. यामुळे भारतीय लोकशाहीची व्यवस्था स्वातंत्र्याच्या भूमिकेतलीच आहे, असेच जर कोणी ठरवू पाहत असतील, तर ते वस्तुस्थितीला धरून नाही, असेच शेवटी म्हणावे लागेल! अर्थात, सध्याच्या भारतीय लोकशाहीचे जे भ्रष्ट व ओंगळवाणे स्वरूप समोर आलेले दिसते आहे ते स्वातंत्र्याच्या भूमिकेची प्रतारणा करणारेच आहे, असे जर कोणालाही वाटत असेल, तर त्याचा आस्थापूर्वकच विचार करायला हवा. कारण, तथ्यात्मक दृष्ट्या विचार केल्यास भारतीय लोकशाहीचे सध्याचे दिसणारे भ्रष्ट व ओंगळ स्वरूप हे ब्रिटिश साम्राज्यवादात जोपासल्या गेलेल्या सरंजामशाहीच्या संस्कारातलेच आहे, हे सहजच लक्षात येऊ शकते. कारण, याची वस्तुस्थिती कोणत्याच कारणामुळे दृष्टिआड करता येत नाही व दृष्टिआंड करूही नये! याविषयीचे स्पष्ट संकेत महात्मा गांधींनी १९०७ साली लिहिलेल्या 'हिन्द स्वराज्य' या पुस्तकात दिलेलेच होते. कारण, महात्मा गांधींनी ब्रिटिश पार्लमेंटला 'वेश्या' व 'वांझ' या दोन शब्दांचा वापर करूनच जगासमोर सर्वप्रथम उघडे पाडले होते. या वेळी भारताच्या लोकसभेसाठीही तेच शब्द उपयोगात आणले गेले तर फारसे आक्षेपार्हय मानले जाणारही नाही! कारण, ब्रिटिश पंतप्रधान पार्लमेंटचा आपल्या मर्जीनुसार उपभोग घेतो व पार्लमेंटवर दबाव आणल्याशिवाय ती स्वतःच्या प्रेरणेतले निर्णय करूच शकत नाही, हे दोन्ही महात्मा गांधींनी ब्रिटिश पार्लमेंटवर लावलेले आक्षेप या वेळी भारताच्या बाबतीतही लावता येऊ शकतील, अशीच परिस्थिती झालेली दिसते आहे! तेव्हा, यावर विचार करताना भारतीय लोकशाहीच्या व्यवस्थेचे स्वरूप स्वातंत्र्याच्या भूमिकेशी जुळणारे नाही, हे लक्षात घेता येऊ शकते व घ्यायलाही हवेच! कारण, हे लक्षात घेतल्याशिवाय लोकशाहीचे स्वरूप स्वातंत्र्याला अनुसरूनच घडायला हवे आहे, ही केली जाणारी वा केली गेलेली अपेक्षा निरर्थकच ठरू शकते. याचे भान ठेवूनच भारताची राज्यव्यवस्था स्वातंत्र्याच्या भूमिकेला अनुसरूनच ठेवायला हवी, या अपेक्षेनुसार तिचे स्वरूप घडवण्याच्या दिशेने पावले उचलली जाऊ शकतील. अन्यथा भारताची राज्यव्यवस्था स्वातंत्र्याच्या भूमिकेहून वेगळी व निव्वळ स्वैराचाराचीच राहू शकेल. याचा प्रत्यय सध्या येतच आहे व यांतूनच लोकशाहीची म्हणवली गेलेली संसदीय उपचाराची व्यवस्था हिंसक दुष्प्रवृत्ती व फॅसिस्ट दुष्प्रवृत्ती या दोन्हींची कास धरणाऱ्यांची बटिक होऊही शकेल! अर्थात, हे लक्षात घेऊनच भारतीय राज्यव्यवस्था कशी असावी यावर विचार करायला हवा.

२

सध्याच्या परिस्थितीत आणखी एक बाब लक्षात घ्यायला हवी. ब्रिटिश पार्लमेंटच्या पद्धतीतून जी परंपरा निर्माण केली गेली, त्यातून वृत्तपत्रे व प्रसारणांच्या माध्यमांना लोकशाहीचा चौथा स्तंभ मानले गेले आहे. अलीकडे यात इलेक्ट्रॉनिक प्रसारण माध्यमांची भर पडलेली आहे, ज्यांना न्यूज चॅनल अथवा वृत्तवाहिन्या म्हटले जाते. प्रसारणांच्या माध्यमांना लोकशाहीच्या लोकशिक्षणासाठी आवश्यकच मानले गेले असल्यामुळे त्यांचे स्वागतच केले गेले आहे, ते करायलाही हवे. पण, राजकीय पक्ष व त्यांच्या युत्यांच्या बाबतीत त्यांच्या राजकारणी कृत्यांना ते अयोग्य असले तरीही उत्तेजन देण्याचे तंत्र अवलंबले गेले असल्यामुळे जी हीन पातळी राजकीय पक्षांची झालेली दिसते आहे, तीच हीन पातळी प्रसारणांच्या माध्यमांची अथवा वृत्तवाहिन्यांचीही झालेली अलीकडे उघडपणेच दिसते आहे! म्हणून, कार्पोरेट व औद्योगिक घराणेशाहीच्या व अन्य घातक शक्तींच्या नियंत्रणाखाली गेलेल्यांच्या राजकारणाचा प्रभाव जसा जनमानसावर पडताना दिसत आहे, तसाच प्रभाव प्रसारणांच्या माध्यमांचा

वृत्तवाहिन्यांचाही पडताना दिसते आहे. एका अर्थी प्रसारणांची माध्यमे व वृत्तवाहिन्यांचेही स्वतःचे राजकारण होत आहे व त्यालाही हीन पातळी लाभलेली असावी, हेच त्यांचे स्वरूप पाहताना वाटतेही आहे! अर्थात, कार्पोरेट व औद्योगिक घराण्यांनी वृत्तवाहिन्या व प्रसारणांची माध्यमे स्वतःचे हितसंबंध जपण्यासाठीच चालवल्याचे जाणवत असते व लोकांमध्ये लोकशाहीची जाण वाढण्यासाठी याचा योग्य तो परिणाम होत आहे, असे अर्थातच म्हणता येत नाही आहे! म्हणून, राजकीय खेळीकडे जसे पाहिले जाते आहे, तसेच वृत्तवाहिन्या व प्रसारणांच्या माध्यमांकडेही पाहिले जाते आहे. यातून लोकशाहीच्या चौथ्या स्तंभाची भूमिका वठवलीच जात नसून लोकशाहीच्या चौथ्या स्तंभाची भूमिका म्हणून काही प्रयोजनकारी असू शकते व आहे, या संकल्पनेलाच विकृतावस्था आलेली असावी, असेच म्हणता येऊ शकते आहे!

स्वातंत्र्यपूर्व काळात जवळपास सर्वच प्रसारणांची माध्यमे स्वातंत्र्याच्या भूमिकेला अनुकूल राहिली नव्हती. कारण, ती सर्व व्यावसायिक लाभासाठी चालवली जात होती. म्हणून, त्यांच्याकडून स्वातंत्र्याच्या चळवळीला समर्थन मिळायला हवे याची अपेक्षाही केली जात नव्हती. कारण, ही बहुतेक सर्वच माध्यमे ब्रिटिश साम्राज्याचे आधिपत्य मानणारी होती. हे लक्षात घेऊनच स्वातंत्र्याच्या चळवळीत स्वातंत्र्याचे समाजप्रबोधन करण्यासाठी लोकमान्य टिळकांनी 'केसरी' पत्राची व महात्मा गांधींनी 'हरिजन' पत्राची योजना केली होती. या पत्रांमधूनच स्वातंत्र्याच्या चळवळीचे समाजप्रबोधन केले जात होते. तेव्हा, शासन अथवा कार्पोरेट्स व औद्योगिक घराण्यांच्या नियंत्रणातली प्रसारणांची माध्यमे व वृत्तवाहिन्या लोकशाहीचे समाजप्रबोधन करू शकतील, असे मानले जाऊ नये. कारण, यांच्याकडून समाजप्रबोधन करणे शक्य होणारच नाही, हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे. अर्थात, ब्रिटिश लोकशाहीच्या पद्धतीत प्रसारणांच्या माध्यमांना व वृत्तपत्रांना लोकशाहीच्या चौथ्या स्तंभाचे महत्त्व दिले गेले होते. कारण, ती ब्रिटिश साम्राज्याच्या नियंत्रणातलीच होती; अर्थात, लोकांच्या स्वातंत्र्याची जपणूक करण्याच्या उद्देशातली व त्या पात्रतेची नव्हती. म्हणून, भारतात लोकशाहीच्या चौथ्या स्तंभाचे महत्त्व वृत्तपत्रांना व प्रसारणाच्या माध्यमांना देणे भारतीय स्वातंत्र्याच्या भूमिकेला अनुसरून नसल्यामुळे ते उपयोगाचे नसते व नाही, हे स्पष्टच आहे. उलट, प्रसारणाची माध्यमे स्वातंत्र्याच्या भूमिकेशी निगडित अशा लोकशाहीच्या व्यवस्थेला घातकच ठरतात, हेच सध्या भारतात प्रत्ययाला येत आहे. म्हणून हे निक्षून लक्षात घ्यायला हवे आहे!

३

स्वातंत्र्याला अनुसरूनच भारताच्या राजकीय व्यवस्थेची कल्पना करायला हवी व तशीच राजकीय व्यवस्था अस्तित्वात आणायलाही हवी. पण, भारतातल्या राजकीय पक्षांची भूमिका या बाबतीत संयमित राहिलेली नाही व तशी राहू शकतही नाही, ही एक वस्तुस्थिती आहे. तेव्हा, याचा विचार करताना लोकशाहीत राजकीय पक्षांचे प्रयोजन व उपयुक्ततेविषयी ठाम अशी भूमिका घ्यायला हवी आहे!

या बाबतीत यापूर्वी जो विचार केला गेला होता, तो जाणून घ्यायला हवा. ब्रिटिश लोकशाहीला साम्राज्यवादाचा विळखा पडल्यामुळे स्वातंत्र्याची भूमिका ब्रिटिश लोकशाहीला लाभू शकली नव्हती. म्हणूनच भारतात स्वातंत्र्याची चळवळ करावी लागली होती. पण, १९१७ साली रशियात बोल्शेविक क्रांती घडून आल्यानंतर राजकीय व्यवस्थेची कम्युनिझमप्रेरित जी राज्यव्यवस्था रशियात व चीनच्या क्रांतीनंतर त्या ठिकाणी आली, तिच्या अनुकरणातून अन्य कम्युनिस्ट व समाजवादी राष्ट्रांतूनही ती अस्तित्वात आली! या-सर्वांचा अनुभव लक्षात घेऊनच स्वातंत्र्याला अनुरूप राज्यव्यवस्थेचा विचार जगात केला जाऊ लागला व यातून काही नवी विचारसरणी उदयास आली. त्यातल्या रशियन क्रांतीनंतरच्या परिस्थितीत ज्यांनी नवी राज्यव्यवस्थेची मांडणी करण्याचा प्रयत्न केला होता, त्यात लक्षात घेण्यासारखे एक नाव (स्व.) मानवेन्द्रनाथ रॉय यांचे आहे. मानवेन्द्रनाथ रॉय रशियन क्रांतीची व्यूह रचनाऱ्यांपैकीच एक कॉम्रेड लेनिनचे विश्वासू सहकारी होते. रशियात बोल्शेविक क्रांती घडून आल्यानंतर लेनिनच्या पश्चात स्टॅलिनकडे रशियाची राज्यसूत्रे आल्यावर तो हुकूमशहा झाला व त्याने स्वतःला अनुकूल नसलेल्यांचा नायनाट करण्याचे

सत्र सुरू केले. यात मानवेन्द्रनाथ रॉय व एलन रॉय अडकले होते. म्हणून या दंपतीने रशियाचा त्याग केला व स्वतःच्या संरक्षणासाठी ते भारतात डेहराडूनला आले होते. रशियाच्या क्रांतिकाळातले जे महत्त्वाचे दस्तऐवज रॉयदंपतीकडे होते, त्यांचे संशोधन करून त्यांवर नवा प्रकाश टाकण्यासाठी या दंपतीने लेखनकार्य सुरू केले होते. ते स्टॅलिनच्या विरोधात जाणारे होते. हे जाणूनच स्टॅलिनने रॉयदांपत्याची हत्या करण्याचा कट रचला व यातच एलन रॉयचा बळीही गेला! मानवेन्द्रनाथ रॉय या कटाचे बळी होऊ शकले नाहीत. त्यांनी बोल्शेविक क्रांतीनंतरच्या परिस्थितीचा विचार करूनच परिवर्तनाचा नवा राजकीय दृष्टिकोण जगासमोर मांडण्याचा प्रयत्न केला होता. यातूनच 'न्यू ह्यूमॅनिझम'चे तत्त्वज्ञान पुढे येऊ शकले. याचा मराठी भाषेत 'नव मानवतावाद' हा अनुवाद केला गेला आहे. अशा तऱ्हेने जागतिक संदर्भातच मानवेन्द्रनाथ रॉय यांनी राजकीय व्यवस्थेचे नवे स्वरूप रेखांकित करण्याचा प्रयत्न केला होता व यातूनच 'पार्टीलेस डेमॉक्रसी' म्हणजे 'पक्षविरहित लोकशाही' ही नवी राजकीय व्यवस्थेची संकल्पना पुढे आणली व तिची मांडणी केली. या दृष्टीनेच नव्या राजकीय पक्षाची कल्पनाही केलीच होती. पण, 'पक्षविरहित लोकशाही'चा नवा राजकीय विचार यातून पुढे सरकूच शकला नव्हता व मानवेन्द्रनाथ रॉय यांच्या 'नव मानवतावादा'चा काही बुद्धिजीवी लोकांचा एक गटच तेवढा भारतात शिल्लक राहू शकला. पण, या गटाचा भारताच्या राजकारणावर प्रभाव पडू शकला नाही व तो निस्तेज होऊनच शिल्लक उरला! पण, भारतीय लोकशाहीच्या राज्यव्यवस्थेचा नवा विचार मात्र यातूनच स्फुरत राहिला व भारतातल्या संसदीय लोकशाहीला पर्याय शोधण्याच्या प्रयत्नांना बऱ्यापैकी चालनाही मिळाली!

४

भारताचा नियोजनबद्ध विकास साधण्याच्या दृष्टीने राष्ट्रीय नियोजन मंडळाची निर्मिती स्वातंत्र्यात केली गेली. यातून पंचवर्षीय योजनांचा उद्‌भव झाला. पण तो यशस्वी होत नाही हे लक्षात येऊ लागले. याची कारणे शोधण्याचा प्रयत्न केला गेला होता. (स्व.) जवाहरलाल नेहरू त्या वेळी पंतप्रधान होते. त्यांनी याला चालना दिली. कारणे शोधण्याच्या उपक्रमातच (स्व.) बलवंतराय मेहता समितीची निर्मिती करण्यात आली. या समितीने जो अहवाल तयार केला होता, त्यात स्पष्टपणे सांगितले गेले होते, की विकासकार्यात लोकांचा प्रत्यक्ष सहभाग नसतो व नाही. म्हणून, लोकांचा सहभाग मिळवण्याच्या दृष्टीने लोकात सक्रियता आणण्यासाठी लोकशाहीचे विकेन्द्रीकरण किंवा केन्द्रसत्तेचे विकेन्द्रीकरण केले जावे, असे मानले गेले. यातूनच लोकशाहीचे विकेन्द्रीकरण करण्यास्तव पंचायतराज्याची कल्पना पुढे आली. आंध्र व राजस्थान या दोन राज्यांत याचे प्रयोग केले गेले. याचा महात्मा गांधींच्या 'पंचायत राज्य' व्यवस्थेच्या संकल्पनेशी काहीही संबंध नव्हता व नाही. पुढे बलवंतराय मेहता समितीच्या अहवालाचा आधार घेऊन सर्वच राज्यांमधून पंचायत राज्य समित्या स्थापन केल्या गेल्या. यात (स्व.) जयप्रकाश नारायण यांनी मौलिक स्वरूपाचे योगदान दिले होते व त्याचा पंचायत राज्यव्यवस्था अस्तित्वात आणण्यासाठी मोठा हातभार लागला होता. महाराष्ट्राने स्वतःची वसंतराव नाईक समिती नेमली व या समितीच्या शिफारशीनुसारच महाराष्ट्रात पंचायत राज्यव्यवस्थेची निर्मिती झाली. आज देशात सर्व राज्यांत पंचायत राज्यव्यवस्था निर्माण करण्यात आली व जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत अशा तीन संलग्न स्तरांवर पंचायत राज्यव्यवस्था राबवली जाते आहे. पण, याचा जो काही अनुभव आला व येतो आहे, त्यावरून लोकशाहीच्या व्यवस्थेत व पंचवर्षीय योजना यशस्वीपणे राबवण्यासाठी लोकांचा प्रत्यक्ष सहभाग निर्माण झाला आहे, असे म्हणण्याइतपत प्रत्यक्षात प्रगती झालेली नाही. फक्त पंचायत राज्यव्यवस्थेची एक नवी यंत्रणा अस्तित्वात आली एवढेच म्हणता येईल! ही यंत्रणा निवडणुकांतूनच अस्तित्वात आणली जाते. पण, लोकांचा प्रत्यक्ष सहभाग सत्तेच्या विकेन्द्रीकरणातून साधला जाणे शक्य आहे, असे जे मानले गेले होते, त्याचे लोकशाही सुदृढ करण्याच्या दृष्टीने काही आशादायक फलित निघाले आहे, असे मात्र म्हणता येत नाही! अर्थात, ज्याला विकेन्द्रीकरण म्हटले गेले, ते सत्तेचे असो अथवा लोकशाहीचे असो, त्यात सत्तेच्या मूळ स्वभावाचा विचारच केला गेला नव्हता व केन्द्रीकरणात जो (राजकीय) सत्तेचा स्वभाव असतो,

तोच विकेन्द्रित होऊन खेड्यांतही जसाचा तसा पोचला! अर्थात, हेच स्वाभाविक होते. कारण, राजकीय सत्तेचा स्वभाव सर्वंकष होण्याचाच आहे. म्हणून, सर्वंकषतेतून जी शोषणाची प्रक्रिया चालत असते, ती जशी केन्द्रात चालत असते तशीच ती विकेन्द्रित झाली तरी खेड्यातही चालतेच आहे! यात समाजशास्त्रीय दृष्टिकोणाचा अभाव दिसून आला व तो लोकशाहीच्या व्यवस्थेत लोकांचा प्रत्यक्ष सहभाग निर्माण करण्याच्या दृष्टीने निव्वळ अपयशी ठरला. म्हणून केन्द्रसत्तेत जशी सत्तास्पर्धा चालते तशीच सत्तास्पर्धा ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद या तीनही पातळ्यांवर खेड्यांतही सुरूच राहिली आहे. म्हणून केन्द्रसत्तेतलेच दोष जसेच्या तसे खेड्यांतही उतरले आहेत. अर्थात, सत्तेच्या विकेन्द्रीकरणामुळे किंवा पंचायत राज्यव्यवस्थेमुळे लोकशाहीच्या दृष्टीने गुणात्मक परिवर्तन येऊच शकले नाही. यामुळे राज्यव्यवस्थेत लोकांचा प्रत्यक्ष सहभाग निर्माण केला जावा ही इच्छा व आकांक्षा फलद्रुप होऊ शकली नाही. यातूनच लोकांच्या सहभागाच्या लोकशाहीचा (पार्टिसिपटेरी डेमॉक्रसी) नवा विचार पुढे आला. याची वैचारिक व सैद्धांतिक मांडणी या देशात सर्वप्रथम (स्व.) जयप्रकाश नारायण यांनीच केली. यासाठी त्यांनी 'रिकन्स्ट्रक्शन ऑफ इंडिया : पालिटी' हा प्रबंध इंग्रजीमध्ये लिहिला व यावर देशात व परदेशात अनेक प्रकारचे परिसंवादही घडून आले. यातून परिशुद्ध होऊनच एक नवी संकल्पना पुढे येऊ शकली, जिला 'लोक-स्वराज्य' म्हटले गेले आहे. 'लोकस्वराज्या'ची संकल्पना राज्यव्यवस्थेचे स्वरूप उलगडवून दाखवणे एवढ्याच मर्यादेतली नाही. महात्मा गांधींनी ज्या मूलभूत परिवर्तनाच्या ग्रामस्वराज्याची कल्पना केली होती व विनोबांनी वैचारिक व तात्त्विक दृष्ट्या त्यांचा विस्तार केला होता, त्याच्या दृष्टिकोणाला सुदृढ करूनच अत्याधुनिक जाणिवेतून ते प्रस्तुत केले गेले आहे. या संकल्पनेत संसदीय लोकशाहीचे स्थान व महत्त्व एका मर्यादित अर्थानेच स्वीकारले गेले आहे. कारण, संसदीय लोकशाही ही केवळ एक राजकीय व्यवस्था आहे. ते 'जीवन-दर्शन' नाही. 'राज्यव्यवस्था' आणि 'जीवन-दर्शन' या दोहोंत फरक आहे. स्वातंत्र्याच्या भूमिकेत राज्यव्यवस्था बदलती राहू शकते व राहायला हवी, असेच मानले गेले आहे. तेव्हा, संसदीय लोकशाही स्वातंत्र्याच्या भूमिकेत जेवढ्या महत्त्वाची व जेवढी प्रयोजनकारी मानली जाऊ शकते, तेवढ्यापुरताच तिचा स्वीकार करायला हवा. यापेक्षा अधिक ती महत्त्वाची व प्रयोजनकारी मानण्याची गरज नसावी, हेच 'लोक-स्वराज्या'च्या संकल्पनेत अपेक्षितही आहे! पण, संसदीय लोकशाहीचा पुरस्कार करणाऱ्यांच्या दृष्टीने व भारतीय राज्यघटनेचा पुरस्कार करण्याच्या दृष्टीतही हा एक विचार भेदाचा व मतभेदाचा विषय ठरू शकतो व ठरलेलाही आहे! कारण, संसदीय लोकशाहीचा पुरस्कार करणाऱ्यांना ती स्वातंत्र्याला अनुसरून स्वीकारलेली एक राजकीय व्यवस्था आहे, हेच मुळात मान्य होण्यासारखे नाही व नसावे, असे वाटते. अर्थात, लोकशाही ही एक 'जीवन-दृष्टी' मानूनच तिचा संसदीय उपचार अपरिहार्यच ठरतो, अशी एक निष्ठा व्यक्त केली जाते व ती अपरिवर्तनीयच मानली जावी, असा आग्रहही त्यात दिसतो. म्हणून, 'लोकस्वराज्य' व संसदीय लोकशाही या दोन्ही संकल्पना परस्परांना पूरक-पोषक ठेवण्याचा प्रश्न उपस्थित झाला आहे! पण, स्वातंत्र्याच्या संदर्भात संसदीय लोकशाहीचे प्रयोजन सिद्ध करता येणारच नसेल तर काय करायचे, असाही एक प्रश्न उपस्थित झाला आहे! अर्थात, याकडे दुर्लक्ष करून चालण्यासारखे नाही. पण, या बाबतीत या देशात राजकीय व्यवस्थेच्या स्वरूपाचा विचार केला जात नाही. कारण, संसदीय लोकशाहीचा पगडा ज्यांच्या मनावर बसलेला आहे, त्यांना संसदीय लोकशाहीची उपयुक्तता व प्रयोजन या दोन्ही गोष्टी भारतीय स्वातंत्र्याच्या दृष्टीनेच केवळ स्वीकृत झालेल्या आहेत व स्वीकृत असाव्यात, याचे आकलन त्यांच्याकडून केले जातच नसावे, असे वाटते. पण, यामुळे संसदीय लोकशाहीच्या स्वरूपाला राजकीय पक्षांकडून निवडल्या जाणाऱ्या लोक-प्रतिनिधींची विस्तारित होत जाणारी गुन्हेगारीची पार्श्वभूमी संसदीय लोकशाहीच्या आस्थेवाइकांच्या वतीने लक्षातच घेतली जात नसल्यामुळे एकतऱ्हेचा साचलेपणा आलेला आहे. हा साचलेपणा दीर्घकाळ तुंबलेल्या पाण्याला सडलेपणातून दुर्गंधी यावी त्या प्रकारचाच झालेला जाण-वतही आहे. म्हणून, हा साचलेपणा स्वातंत्र्याला आरोग्य-दायी राहिलेलाच नसेल, तर ते स्वाभाविक व नैसर्गिकच म्हणायला हवे!






५

अलीकडच्या काळात भ्रष्टाचाराच्या विरोधात सत्याग्रह-उपोषण केले जातात म्हणून असेल कदाचित; 'लोकपाल' विधेयकाच्या आवश्यकतेवर भर दिला गेला असावा. यातूनच भ्रष्टाचाराच्या निर्मूलनासाठी प्रभावी कायदा केला जावा, असेही म्हटले गेले आहे. अर्थात, या बाबतीतले अनेक कायदे उपलब्ध असूनही एका नव्या विधेयकाचा नवा कायदेशीर उपचार करून त्यातून कायद्याची यशस्वी अंमलबजावणी केली जावी, अशी अपेक्षा केली गेली आहे. ही अपेक्षा हतबलतेतूनच केली गेली आहे! कारण, प्रभावी कायदा मुळात नाही व कायद्यांची प्रभावी अंमलबजावणीही होत नाही, अशा एका समजुतीतून ही अपेक्षा केली गेली आहे. पण, कायद्यांची प्रभावी अंमलबजावणी म्हणजे नेमके काय, हे स्पष्ट करायला हवे आहे. याला 'कठोर' हा शब्द जोडून त्याला वजनदार करण्याचा प्रयत्न होतोही आहे. संसदीय लोकशाहीच्या कार्यपद्धतीत कठोरपणा जर आणायचाच असेल, तर हा कठोरपणा लोकशाहीच्या मर्यादेत ठेवता येऊ शकेल किंवा काय, याचाही विचार करायला हवा! कारण, लोकशाहीच्या मर्यादेत लोकशाहीचेच कायदे घडवले जातात व ते लोकप्रतिनिधींच्या क्षमतेतलेच असूही शकतात व असतात, या दृष्टीने जी काही बहुमताची पद्धती अवलंबिली गेलेली आहे, ती प्रभावी कायदा करण्याची व अंमलबजावणी करण्याच्या भूमिकेतली असावी, हेच अपेक्षितही आहे. पण, ही अपेक्षापूर्ती होणारच नसेल किंवा होतही नसेल, तर कायदा करण्याची व अंमलबजावणीची प्रक्रियाच सदोष राहून जाते, असेच म्हणावे लागेल. अर्थात, यातच संसदीय लोकशाहीची मर्यादा स्पष्ट होत असते. म्हणून, कायद्यातला कठोरपणा व अंमलबजावणीतला कठोरपणा दोन्ही साधावयाचे झाल्यास कठोरपणा आणला जाऊ शकेल त्या पद्धतीचाच स्वीकार करावा लागेल. या दृष्टीने संसदीय लोकशाहीची कार्यपद्धती उपयोगी ठरतच नसेल, तर तिला पर्याय शोधायला हवा व राज्यव्यवस्था प्रभावी करण्याच्या दृष्टीने लष्करशाहीचाच पर्याय स्वीकारणे कदाचित अपरिहार्य होऊन बसेलही! म्हणून, या बाबतीत भ्रष्टाचाराचा विरोध करणाऱ्यांनी व 'लोकपाल' विधेयकाची मागणी करणाऱ्यांनी विचार करायला हवा. पण, याचा विचार केलाच जात नसावा, असे वाटते. कारण, भ्रष्टाचार कसा नष्ट करता येईल याची, संसदीय लोकशाहीला अनुसरून जे काही करता येण्यासारखे असू शकेल किंवा आहे त्याची सुस्पष्ट कल्पना, भ्रष्टाचारविरोधाची घोषणाबाजी करणाऱ्यांजवळ नसावी व नाही, असे वाटते. म्हणून, भ्रष्टाचारविरोधाच्या घोषणा नुसत्या वल्गना ठरतात व भ्रष्टाचारविरोधाची चळवळ ही पाण्यावर रेघा ओढण्याच्या प्रयत्नातलीच ठरून विरूनही जाते. तेव्हा, या बाबतीत मूलभूत दृष्टिकोण स्वीकारण्याची गरज आहे. या गरजेतूनच असेल कदाचित, भ्रष्टाचाराचा विरोध करणाऱ्यांनी व 'लोकपाल' विधेयकाचा पुरस्कार करणाऱ्यांनी निवडणूक पद्धतीत सुधारणा करण्याची मागणी निवडणूक आयोगाकडे केलेली आहे. याला अनुसरूनच प्रतिनिधीला परत बोलावण्याची–ज्याला इंग्रजीत 'रिकॉल' म्हटले जाते–मागणी केली गेली आहे. या मागण्या रास्त जरी म्हटल्या, तरी एकूण संसदीय लोकशाहीच्या कार्यपद्धतीत त्या कशा व कोणत्या क्रमात बसवायला हव्यात, हे पहावेच लागेल! अर्थात, तत्काळ काही सुचले म्हणून घोषित करीत गेल्याने त्यातून निश्चित प्रकारची पद्धती अस्तित्वात येत नसते व येत नाही. खरे तर संसदीय लोकशाहीच्या निवडणूक पद्धतीचाच पुनर्विचार करायला हवा. यात राजकीय पक्षांची जी भूमिका असते व आहे, त्याचाही पुनर्विचार करायला हवा. ज्यांनी याचा विचार याआधी केला होता व अजूनही करतात, तेही लक्षात घ्यायला हवे! हे सर्व राज्यव्यवस्थेच्या पुनर्रचनेच्या संदर्भातले बिंदू आहेत. म्हणून, तेच प्रथम लक्षात घ्यायला हवेत! याची सुरुवात मतदार संघाच्या बांधणीतूनच केली जाऊ शकते व करायलाही हवी आहे! पण, याकडे दुर्लक्ष करून केवळ लोकक्षोभ व्यक्त करण्याच्या पद्धतीतून चळवळ करणे कोणत्याच कारणामुळे फायदेशीर ठरणार नाही. कारण, यातून केवळ उथळपणाच दिसून येतो!

**उपसंहार :**

राज्यकारभारात लोकांचा प्रत्यक्ष सहभाग निर्माण करण्याच्या दृष्टीने विचार करावयाचाच जर निश्चय केला गेला, तर त्याची विशिष्ट पद्धतीच असू शकते. म्हणून, त्या पद्धतीनेच विचार करायला हवा! यात सर्व-

प्रथम संसदीय लोकशाही व राजकीय पक्षांची जी उपयुक्तता व प्रयोजन मानले गेले आहे त्याचाच पुनर्विचार करण्याची गरज आहे, कारण, लोकशाहीसाठी राजकीय पक्षांचे प्रयोजन मान्य केल्यामुळे जे अनिष्ट घडणे शक्य होते ते घडलेले आहे व यातूनच नवनवे जाचक प्रश्न उपस्थित झालेले आहेत. या प्रश्नांची सोडवणूक करता येत नसल्यामुळे संसदीय लोकशाही अगतिक झाली असावी, अशीच एक स्थिती निर्माण झाली आहे! याच्या तपशिलात जाऊन विचार करण्याची गरज आहे. अर्थात, जमेल तेवढा विचार करणे अपेक्षितही आहे!

☆☆☆

---

# जागतिक वित्तीय व्यवस्थेत करावयाच्या सुधारणा

श्री. सी. पं. खेर

**प्रास्ताविक**

१९९७-९८ मधील आग्नेय आशियातील आणि २००७-०८ मधील अमेरिकेतील वित्तीय अरिष्ट यांतून जग पूर्णपणे बाहेर आलेले नाही. उलट, १९३० सारखी दीर्घकाळाची व गडद मंदी, जागतिकीकरणामुळे, संगणक व ई-मेलसारख्या नवतंत्रज्ञानामुळे जवळ आलेल्या जगास पुनः एकदा विळखा घालेल की काय अशी, भीती सर्वत्र घर करून राहिलेली आहे. अमेरिकेत, नवप्रवर्तक, उद्योजक नवे उद्योग सुरू करायला अद्याप पुढे येत असल्याचे दिसत नाही. नव्या उद्योगांची निर्मिती, १९८०च्या तुलनेत, २००८ मध्ये २३ टक्क्यांनी घटलेली आढळली. बेकारीचे प्रमाण २०१० मध्ये १०.१ टक्के आढळले. वित्तीय अरिष्टानंतर पूर्वस्थितीवर अर्थव्यवस्था येण्यासाठी निदान चार वर्षे लागतात (म्हणजे २०१२-१३ साल उजाडावे लागेल), असे संख्याशास्त्रज्ञ सांगतात.[1] उलट, वित्तीय अरिष्टे का आली, त्यांमागील कारणांचे विश्लेषण करून त्यातून मार्ग कसा काढावयाचा, याचा विचार करण्यासाठी संयुक्त राष्ट्र संघाने प्रोफेसर जोसेफ स्टिग-लिट्स यांच्या अध्यक्षतेखाली विकसित आणि विकसन-शील देशातील मिळून १७ जणांचा एक आयोग जून २००९ साली नेमला. (त्यात भारताचे वाय्. व्ही. रेड्डी यांचा समावेश होता.) या आयोगाचा अहवाल जानेवारी २०१० मध्ये आला. सर्वत्र उपलब्ध झाला आहे. या आयोगाच्या सूचनांचे थोडक्यात विवेचन करण्याचा या लेखाचा प्रयत्न आहे.

या आयोगाने आंतरराष्ट्रीय नाणेनिधीत (आय्. एम्. एफ्.) तसेच जागतिक वित्तीय व्यवस्थेत कशा व कोणत्या सुधारणा करावयास हव्यात, याचा ऊहापोह केला आहे. त्यासाठी त्यांनी चार कार्यकारी गट निर्माण केले होते. त्यांचा एकत्रित अहवाल पुस्तकरूपाने स्टिगलिट्स रिपोर्ट म्हणून प्रसिद्ध झाला आहे.[2]

२

**अरिष्टांची कारणे**

१९८० च्या दशकापासून आर्थिक व्यवहारांचे शिथिलीकरण, निर्नियंत्रणीकरण, खासगीकरण, जागतिकी-करण हे परवलीचे शब्द झालेले आहेत. १९४५ ते १९७० अशी पंचवीस वर्षे, विदेशी चलन-विनिमय दर स्थिर असावा, ज्या देशांची विदेशी येणेदेणे बाकी प्रतिकूल असेल व त्यामुळे जे अडचणीत आले असतील त्यांना आंतरराष्ट्रीय नाणेनिधीने अल्पकाळ वित्तीय साहाय्य करावे, समग्र प्रभावी मागणी (उत्पादनयंत्रणा सज्ज पण थंड पडलेली असता) तोकडी पडेल तेव्हा (सरकारने) गुंतवणुकीचे सामाजिकीकरण करावे, अशा तत्त्वांचा या काळात पगडा होता. पण यातून अवरोधीवृद्धीची परिस्थिती म्हणजे भाववृद्धी, बेकारीत वाढ, घटते उत्पादन अशी परिस्थिती निर्माण होते, भाववृद्धी आटोक्यात राहत नाही अशी समजूत झाली व ती पसरली गेली. वास्तविक १९७० मध्ये जी भाववृद्धी होत गेली, तिची कारणे वेगळीच होती. व्हिएतनाममधील युद्ध, पेट्रोलच्या किंमतीत एकदम वाढ, दोन तेल-गंडांतरे, उत्पादनात घट, कामगार-संघटनांचे अडवणुकीचे धोरण, उत्पादकतेच्या दरापेक्षा वाढत्या दराने मोबदल्याची मागणी, त्रुटीचे राजकोषीय धोरण व विदेशी चलनविनिमय दराची येथवरच्या निर्बंधनातून मुक्तता अशी अनेक कारणे होती. पण यातून सरकारी हस्तक्षेप असणारे त्रुटीचे राजकोषीय धोरण व विदेशी चलनविनिमय दरावरील नियमन यांवर खापर फोडून कुठेही, कसलाही सरकारी हस्तक्षेप असू नये, सारे व्यवहार खुलेपणाने बाजारावर सोपवावेत, खुला बाजारच उत्पादन विभाजनाचे कार्य कार्यक्षमतेने घडवून आणतो, या विचारावर, सरकारावर प्रभाव पाडू शकणारे अर्थतज्ज्ञ येऊन ठेपले. या तत्त्वावर आधारून जिला वॉशिंग्टन प्रणाली असे संबोधिले जाते, ती बेतली गेली. आंतरराष्ट्रीय नाणेनिधीने ही तत्त्वप्रणाली आत्मसात

केली व नाणेनिधीकडे कर्जसाहाय्य मागण्यास जे देश येतील, त्यांनी ही प्रणाली तत्काळ अमलात आणली पाहिजे अशी आग्रहाची अट लादली. यात विकसनशील देशांनी भांडवली बाजार खुला करावा अशी अट होती. म्हणजे वित्तीय संस्था, जिथे फायदा जास्त, जिथे सरकार स्थिर तिथे भांडवल (प्रामुख्याने रोखे बाजारातून) गुंतवीत राहिल्या; फायदा कमी वाटला, सरकार अस्थिर आहे वाटले, विश्वास डळमळला तर त्या रात्रीतून (नव्या तंत्रज्ञानाने हे साध्य केले) भांडवल काढून घेऊ लागल्या. भांडवली बाजार तत्काळ खुला करण्याच्या आग्रहाचा हा परिणाम होता. आग्नेय आशियातील वित्तीय अरिष्टाचे ते कारण होते.

व्हिएतनाम युद्धामुळे अमेरिकेच्या डॉलरमागे आधार राहिलेला सोन्याचा साठा घटत गेला. त्यामुळे आंतरराष्ट्रीय नाणेनिधीच्या स्थापनेपासून डॉलरचे मूल्य जे सोन्यात निश्चित केले गेले होते (३५ डॉलर्स = १ औंस सोने) ते अमेरिकेने झुगारून दिले. म्हणजे डॉलर्स घेऊन सोने देणे बंद केले.

बाजार खुला असावा, त्यावर सरकारचा हस्तक्षेप, कसलेही नियमन, नियंत्रण असू नये हा विचार अमेरिकेत प्रभावी होता. बाजारात व्यवहार करणारे अभिकर्ते हे तर्कशुद्ध विचार करीत असतात, तर्कशुद्ध अपेक्षा बाळगीत असतात, या गृहीतकावर हा विचार आधारलेला आहे. तर्कशुद्ध व्यवहारामुळे साधनसामग्रीचे विभाजन इष्टतमपणे होते, कार्यक्षमतेने होते, असे मत ठाम होते. अशा वेळी स्व-नियमन सहज घडत असते. तेव्हा बाह्य नियमनाची, नियंत्रणाची मुळीच आवश्यकता नसते. यामुळे सारी नियमने काढून टाकण्याकडे, सारे आर्थिक व्यवहार निर्नियंत्रित ठेवण्याकडे समाज वळला.

वित्तीय व्यवहार याला अपवाद नव्हता. वित्तीय क्षेत्रावर कुणाचाही वचक राहिला नाही, ठेवला गेला नाही. १९७० पासून घर-गहाण-खतांचे रोखे करून, रोखेबाजारात विकण्याची व त्यातून पुनः रोकड उभी करण्याची व त्यातून पुनः (नवीन) घर गहाण ठेवून घेऊन कर्जे देण्याची प्रथा सुरू झाली. जागतिक व्यापारी केंद्रावर ११ सप्टेंबर २००१ रोजी हल्ला झाल्यापासून अमेरिकन फेडरल बोर्डाने व्याजाचे दर कमी करावयास सुरुवात केली. त्यामुळे कर्जे काढून घरे खरेदी करण्यास जोराने सुरुवात झाली. घरांच्या किंमती चढत राहिल्या. व घरांना मागणी वाढली. या सुमारास जपानमध्ये व्याजाचा दर जवळजवळ शून्यावर (०.१० टक्के) आला होता. तेव्हा अमेरिकन वित्तीय संस्था जपानमध्ये कर्ज उभारून घरासाठी कर्जे देऊ लागल्या. रोखेबाजारात घर–गहाण-खत-रोख्यांच्या किंमती वाढत राहिल्या. यातूनच पुढे पतकार्डे, वाहने, शिक्षण यांसाठीची कर्जे इत्यादींचे रोखे करून विकले जाऊ लागले. या रोख्यांवर पुनः कर्जे मिळू लागली. कालांतरात मूळ गहाणदार कोण, तो नीट हप्ते भरतो आहे की नाही, याचा पत्ताच लागेना. गृह-गहाण आधारित रोख्यांच्या किंमती वाढत आहेत, त्या तशाच वाढत राहणार या कल्पनेने सट्टेबाज या रोखेबाजारात घुसले व त्यांनी भाव फुगवत नेले. अशा फुगवट्यातील हवा काढून घेण्यासाठी फेडरल रिझर्व बँकेने २००४ साली व्याजाचा दर वाढविला व सारा प्रवाह मंदीकडे झुकला.

वित्तीय क्षेत्रावरील नियमन नाहीसे केल्याने, घर-इ. गहाणखतांचे रोखेकरण, तेजीच्या काळात कर्जदाराची परत फेडण्याची ऐपत, पत इत्यादींचा विचार न करता वित्तीय संस्थांनी देऊ केलेली कर्जे, गहाण कर्जरोख्यांच्या रोख्यावर पुनः कर्ज देणे अशा व्यवहारांतून २००७-०८ चे वित्तीय अरिष्ट उद्‌भवले व त्याचा फटका साऱ्या जगाला बसला.

स्टिगलिट्झ आयोगाला यातून, यावर उपाय शोधायचे होते व जागतिक वित्तीय व्यवस्था पुनः स्थिर कशी बनेल, हे पाहायचे होते.

स्टिगलिट्झ आयोगाने चार गट स्थापिले होते. त्यांतील दक्षिण आफ्रिकन प्रजासत्ताकाचे वित्तमंत्री ट्रेव्हर मॅन्युएल यांच्या अध्यक्षतेखालील [३] (नऊ सभासदांच्या या उपगटात नोबेल पुरस्कारविजेते अमर्त्य सेन होते.) गटाकडे आंतर-राष्ट्रीय नाणेनिधीच्या शासनात सुधारणा सुचविण्याचे कार्य होते. यापुढे त्याचा ऊहापोह करू.

## ३

## आंतरराष्ट्रीय नाणेनिधीच्या शासनात करावयाच्या सुधारणा

१. आंतरराष्ट्रीय नाणेनिधीत पाश्चात्त्यांचा विशेषतः








अमेरिकेचा मतांच्या जोरावर प्रचंड प्रभाव आहे. प्रत्येक सभासदराष्ट्राला मूलभूत २५० मते दिलेली असून त्याने पुरविलेल्या भांडवलासाठी एक लाख डॉलरला एक मत दिले गेले. यासाठी काही देशांचे मिळून गटही करण्यात आले आहेत. असे एकूण २४ गट बनवले आहेत. १९८७ सालच्या १८२ सभासद राष्ट्रांच्या एकूण मतात अमेरिकेचा १७.७८ टक्के तर सात प्रगत व प्रबळ देशांच्या गटाचा ४४.८२ टक्के मताधिकार होता. सर्व औद्योगिक राष्ट्रांचा मिळून मताधिकार ६२ टक्के तर विकसनशील राष्ट्रांचा फक्त ३८ टक्के आहे. यामुळे नाणेनिधीच्या शासनात विकसनशील राष्ट्रांचा आवाज दबून व दुर्लक्षित राहिला आहे. ही विषमता नाहीशी करावयास हवी.

१९४४ साली जेव्हा नाणेनिधी स्थापला गेला, तेव्हा त्याचे फक्त (भारत धरून) ४४ सभासद होते. तेव्हा मूलभूत मतांचे प्रमाण एकूणात ११.३ टक्के होते. २००० सालात (नवे सभासद धरून) १८४ सभासदांचा मूलभूत मताधिकार २.१ टक्के एवढा खाली आला. २००६ व २००८ मध्ये काही सुधारणा केल्या गेल्या, तरी तो ५.५ टक्क्याहून वर गेला नाही. त्याने सुरुवातीचे प्रमाण गाठले गेले नाही. मूलभूत मताधिकार वाढविणे अपरिहार्य असून त्यापायी मूळ संमती-नियमावली बदलायला हवी. तसेच नाणेनिधीचे भांडवल वाढविण्यासाठी, सभासद-राष्ट्रांच्या वाट्यात (कोट्यात) वेळोवेळी कालानुरूप वाढ केली जावी.

**२. नाणेनिधीच्या व्यवस्थापनात आमूलाग्र बदल–**

नाणेनिधीच्या सध्याच्या निर्णयप्रक्रियेत बदल करणे आवश्यक आहे.

नाणेनिधीच्या सध्याच्या शासनव्यवस्थेत राजकीय प्रतिनिधी असले, तरी ते आंतरराष्ट्रीय नोकरशहा होत असे मानले जात आहे. निर्णयप्रक्रियेत त्यांच्या भूमिका व जबाबदारी याबद्दल संदिग्धता आहे. रोजच्या कामात ते इतके गढून गेले आहेत, की व्यापक मार्गदर्शन करायला त्याना फुरसत मिळत नाही. त्यांच्या निर्णयप्रक्रियेने सभासद राष्ट्रांत विश्वास निर्माण केलेला नाही. त्यात त्यांना सयुक्तिकता वाटलेली नाही. समितीला हे बदलायला हवे आहे.

सध्याच्या निवासी कार्यकारी मंडळात सभासदराष्ट्रांनी निवडून दिलेले व त्यांचे प्रतिनिधी म्हणून असलेले चोवीस संचालक आहेत. त्यांतील एकाला कार्यकारी संचालक बनविले जाते. त्याच्या हाताखाली प्रशिक्षित कर्मचारीवर्ग असून तो सभासदराष्ट्रांच्या अल्पकालीन विदेशी येणेदेणे बाकीचा, अडचणीचा, परिस्थितीचा आणि मदतीसाठी केलेल्या अर्जांचा अभ्यास करून तो कार्यकारी संचालकापुढे ठेवतो. कार्यकारी संचालक त्यावर निर्णय घेऊन तो संचालकांची संमती मिळवितो. कार्यकारी मंडळ असे शासकीय तसेच वैधानिक निर्णय घेत आले आहे. पण त्यात राजकीय तसेच सैद्धान्तिक आणि वित्तीय धोरणांच्या मार्गदर्शनाचे प्रतिबिंब पडत असलेले आढळत नाही. म्हणजे कार्यकारी मंडळ केवळ चालू खात्याचा (चालू विदेशी येणेदेणे बाकीचा ) विचार करते. त्याने राष्ट्रांच्या विदेशी भांडवली आयातनिर्यातीचा (विदेशातील रोखे-बाजारात भांडवल गुंतवून लाभ उठविण्याचा व सरकार अस्थिर बनेल, व्याजाचा दर खाली जाईल किंवा विदेशी चलनविनिमय दर चढेल असे वाटले; तर रात्रभरात भांडवल काढून घेण्याचा व्यवहार) व त्यातून होणाऱ्या परिणामांचादेखील विचार करावयास हवा, असे २००७-०८च्या वित्तीय अरिष्टाने दाखवून दिले आहे. याचा विसर पडता कामा नये असे समितीने म्हटले आहे. त्यासाठी नाणेनिधीच्या घटनेत बदल केला जावा, असे सुचविले आहे.

व्यवस्थापकीय (शासन) व्यवस्थेत जुजबी बदल करून केवळ व्यवस्थेची नावे बदलून चालणार नाही; आमूलाग्र बदल हवेत. समितीने त्रिस्तरीय व्यवस्था सुचविलेली आहे.

पहिला (सर्वोच्च) स्तर व्यवस्थापकीय सभेचा (कौन्सिल) असावा. यात राजकीय इच्छा (आवाज) प्रतिबिंबित व्हावी. यात वित्तमंत्री गव्हर्नर्स किंवा "तत्सम हुद्दा असणारे लोक" असावेत. त्यांचे आंतरराष्ट्रीय पैशाच्या व्यवस्थेशी समायोजन करणे, जागतिक रोकडीची जुळवणूक करणे, व्यवस्थापनाचे पर्यवेक्षण करणे असे कार्य राहील. सभेच्या अधिकारास कायद्याचा आधार राहील. त्यास नवी वित्तीय सुविधा निर्माण करण्याचा, निधीच्या पैशाचा योग्य तो उपयोग करण्याचा, घटनात्मक निर्णय

घेण्याचा अधिकार राहील.

त्याखालील दुसरा स्तर "कार्यकारी मंडळाचा" (एक्झेक्यूटिव्ह बोर्ड). त्याने आजच्याप्रमाणे रोजच्या व्यवहारात गुंतून पडू नये, असं समितीला वाटते. त्याने व्यवस्थापकावर बारीक लक्ष ठेवावे. धोरणात्मक टिपणीवर सभेला सल्ला द्यावा. राष्ट्रांच्या एकंदर आर्थिक स्थितीचा आढावा घ्यावा.

तिसऱ्या स्तरात रोजच्या व्यवस्थापनाची गणना करावी. त्यावर कार्यकारी व्यवस्थापन संचालकाचा अधिकार राहील. कर्मचाऱ्यांची नेमणूक, त्यांचे आयोजन करणे, त्यावर देखरेख ठेवणे, हे त्याचे काम असेल. अंदाजपत्रक तयार करणे, धोरणानुसार वित्ताचे विभाजन करणे, मूल्यमापन करणे, अशी कामे त्यांच्या अखत्यारीत, जबाबदारीत राहतील.

अशा त्रिस्तरीय व्यवस्थेने निधीचे राजकीय महत्त्व वाढेल; आंतरराष्ट्रीय वित्तीय व्यवस्थेत महत्त्वाचे स्थान मिळेल; सभासदराष्ट्रांचा विश्वास वाढेल; प्रत्यक्ष आर्थिक परिस्थितीची जाणीव येईल; विकसनशील देशांची भूमिका कळेल व त्यांचा आवाज उठेल.

नाणेनिधीची अशी नवी रचना, मुख्यतः राष्ट्रांचे नवे गट पाडून, निधीच्या भांडवलात विकसनशील देशांचे प्रमाण व त्यानुसार मताधिकार वाढविणारी, नाणेनिधीत पारदर्शकता, व जबाबदारी वाढविणारी नवी रचना-कधी अमलात येईल, हे पाहावयास हवे.

**३. वित्तीय साधनांची पर्याप्त उपलब्धी.**

विकसनशील व मागास देशांना जागतिक वित्तीय व्यवस्थेत भाग घेण्यासाठी प्रोत्साहनाची व म्हणून वित्तीय साहाय्याची गरज आहे. तसेच दारिद्र्यरेषेखालील लोकांना आधार देण्यासाठी, आंतरराष्ट्रीय व्यापारव्यवहारात भाग घेताना उद्योगांना पैसा तोकडा पडला असता, विकसित देशांनी रात्रीत भांडवल काढून घेतले असता, विदेशी चलनाची चणचण भासत असता, विकसनशील व मागास राष्ट्रांना वित्तीय साहाय्याची आवश्यकता असते. वित्तीय अरिष्ट आल्यापासून विकसित देश संरक्षणात्मक (आयात कमी करणारे, स्वदेशाबाहेरून कामे करून देणे कमी किंवा बंद करणारे) धोरण अवलंबू लागले आहेत. त्याचा उलट परिणाम विकसनशील देशांना भोगावा लागत आहे. त्यामुळेही त्यांना वित्तीय साहाय्याची गरज आहे. विदेशी देणेयेणेबाकीसाठीच्या नेहमीच्या गरजेबरोबरच ही जास्तीची गरज भागविण्यासाठी नाणेनिधीने साहाय्य करावयास हवे. शिवाय साहाय्याच्या अटी सैल राखावयास हव्यात. पण त्यासाठी नाणेनिधीचा निधी तोकडा पडत आहे.

निधी वाढविण्यासाठी नाणेनिधीला विशेष आहरण अधिकार (स्पेशल ड्रॉइंग राइट्स–एस.डी.आर)वाढवून देण्यात येतात. तसे ते अलीकडे वीस देशांच्या गटाने–ग-२०–जास्तीचे २५० अब्ज एस्.डी.आर् सर्व देशांसाठी उपलब्ध करून दिले आहेत.

वाढीव एस्. डी. आर्. सभासद-राष्ट्रांच्या मूळ भांडवलानुसार त्यांच्या वाट्यास येतात. म्हणजे २५० अब्ज एस्. डी. आर् विकसित राष्ट्रांना उपलब्ध होतात. विकसित राष्ट्रांना या (हिशेबी) रकमेची गरज लागत नाही. तेव्हा त्यातील न वापरता राहिलेली रक्कम विकसनशील आणि मागास राष्ट्रांची गरज भागविण्यास वापरायला मिळावी, असे आयोगाने सुचविले आहे.[४]

४

**जागतिक वित्तीय व्यवस्थेचे नियमन**

२००७-०८ च्या अमेरिकन वित्तीय अरिष्टाची झळ सर्व पाश्चिमात्त्य देशांना पोचली याचे मुख्य कारण वित्तीय क्षेत्रावरील नियमन, नियंत्रण पूर्णपणे झुगारून दिले हे आहे. चुकीच्या आर्थिक सिद्धांताचा त्यांनी पाठपुरावा केला यात आहे. बाजार खुला राखावा, त्यावर कसलेही बंधन असता कामा नये, खुला बाजार संसाधनांचे विभाजन सुयोग्यपणे, कार्यक्षमतेने करतो, त्यास तो कधीच चुकत नाही, या सिद्धांतावर हा विचार आधारलेला आहे. या विचारात सर्वांना सर्वप्रकारची माहिती असते व ते तर्कशुद्धपणे व्यवहार करतात असे गृहीत धरलेले आहे. पण यामुळे बाजार चुकत आलेला आहे, त्यातून अरिष्टे आली हा नित्य अनुभव आहे. तेव्हा बाजाराचे, वित्तीय क्षेत्राचे नियमन, नियंत्रण नेटकेपणे करीत राहिले पाहिजे, प्रसंगी सरकारने हस्तक्षेप करीत राहिले पाहिजे, हाच त्यावर उपाय आहे.

जागतिक वित्तीय व्यवस्थेचे नियमन कशा तऱ्हेचे असावे याचा स्टिगलिट्झ आयोगाने ऊहापोह केला आहे.








तो यापुढे पाहू.

वित्तीय व्यवस्थेचे (बाजाराचे)नियमन करण्यामागे पुढील उद्दिष्टे आहेत : १. वित्तीय बाजारात स्थिरता राखली जावी; २. समष्टी आर्थिक व्यवस्थेत स्थिरता व विकासाला वाव मिळावा; ३. भांडवलाचा तुटवडा असल्याने त्याचा योग्यपणे उपयोग व विल्हेवारी होत राहीलसे पहावे; ४. समन्वयास प्रवृत्त करावे; ५. नियमनात त्रुटी राहिल्याने होणाऱ्या नुकसानीपासून लोकांच्या पैशाचा बचाव करावा.

ही उद्दिष्टे गाठण्याचे समग्र वित्तीय धोरण असावे. हे धोरण नियमानुसार मर्यादित राहू नये. वित्तीय पुरवठ्यापासून वंचित असलेल्या गटांना, क्षेत्रांना, लोकांना वित्त उपलब्ध व्हावे म्हणून वित्तीय संस्थांना सरकारने उत्तेजन द्यायला हवे. त्यासाठी गरज वाटल्यास नव्या वेगळ्या संस्था उभ्या कराव्या. नवनवीन साधने (कर्जदारांचे प्रकार, शिक्षणासाठी कर्जे, संशोधनाला कर्जे, साहस-भांडवलाची सोय इ.) निर्माण करून पत-पैसा उपलब्ध करून द्यावा. तसेच बचतकर्त्या ठेवीदारांचा पैसा सुरक्षित राहील, बँका आणि वित्तीय संस्था, ठेवी गोळा करणाऱ्या संस्था काही घोटाळे करणार नाहीत, पैसा बुडवणार नाहीत हे उचितपणे पाहण्याचे नियामकांचे कार्य आहे. ज्यांना पैसा उपलब्ध करून दिला जातो ते योग्यपणे पैसा वापरतील, ज्यासाठी पैसा दिला जातो त्याकरिताच तो वापरला जाईल, गुंतवणूकदारांची पत चांगली असेल, त्यांनी दिलेले तारण योग्य असेल, कर्जांचे हप्ते व व्याज ते सरळपणे फेडत राहतील याची हमी असेल, असे सर्व पाहण्याचे काम नियामकांचे आहे. पैसा पुरवण्याच्या कार्याची कुणा एकादोघांची मक्तेदारी राहणार नाही, बँका-बँकांत आणि वित्तीय संस्थांतून उचित स्पर्धा राहील, हेही नियामकांनी पाहावयास हवे. वित्तीय क्षेत्रात स्थिरता राखण्याचे, अर्थव्यवस्थेत तेजी, भाववृद्धी, आर्थिक पिछेहाट, कुंठितता हे टाळण्याचे, तसेच पैशाचा पुरवठा तोकडा राहणार नाही हे पाहण्याचे कार्य नियामकांचे आहे. अशा तऱ्हेचे समग्र वित्तीय धोरण आखण्याचे कार्य सरकारचे आहे. वित्तीय नियमन, अर्थव्यवस्थेत प्रेरक पैशाचा पुरवठा होत राहील व अर्थव्यवस्थेचा विकास होत राहील, असे समग्र वित्तीय धोरण आखले गेले पाहिजे.

वित्तीय नियमन हा समग्र वित्तीय धोरणाचा एक आवश्यक भाग आहे. त्यामुळे बचत सुपूर्त करणाऱ्यांचा आणि गुंतवणूकदारांचा-कर्जदारांचा–विश्वास वृद्धिंगत होत राहील, यात शंका नाही.

वित्तीय व्यवस्थेचे नियमन दोन प्रकारांनी व्हावयास हवे. ते अंशलक्षी व समग्रपणे प्रतिबंध करणारे हवे. वित्तीय संस्थांच्या अंशलक्षी प्रतिबंधनाने अडाणी, कमी शिक्षित ठेवीदारांचे संरक्षण व्हावयास हवे. समग्र प्रतिबंधनाने ठेवीदारांवर येणाऱ्या अप्रत्यक्ष दबावापासून, मोठाल्या, एकमेकात गुंतलेल्या पण अडचणीत आलेल्या, नुकसानीत येऊ घातलेल्या, बेसावधपणे, बेदरकारपणे कर्ज देणाऱ्या व मंदीत चांगली पत असणाऱ्यांनाही कर्ज नाकारणाऱ्या संस्थांच्या व्यवहारापासून संरक्षण मिळावयास हवे.

वित्तीय क्षेत्र सतत चढउतारांनी ग्रासले गेले आहे, असा आजवरचा ऐतिहासिक अनुभव आहे. तेजीत सर्व मत्तेच्या किंमती वाढत राहतात. त्यामुळे आधीच्या मत्तेच्या आधारावर मोठ्या प्रमाणाने बँका कर्ज देऊ धजतात. यात अधिक जोखीम बँका अंगावर घेतात, हे ह्यांना समजत नाहीत. कर्जाऊ रक्कम देतानाचे नेहमीचे निकष त्या सढळ करतात. अनेकदा योग्य तारणाशिवाय त्या कर्ज देऊ धजतात. चढलेल्या किंमती घसरतील याकडे त्या डोळेझाक करतात. पण किंमती उतरू लागल्या, की त्या कर्जदारांकडून अधिक वर्ताव्याची (मार्जिनची) मागणी करतात. कर्जदारांना हे शक्य झाले नाही, वाढत्या प्रमाणाने हप्ते व व्याज देणे जमले नाही, की बँका गोत्यात येतात. काहींना दिवाळेही काढावे लागते. वित्तीय क्षेत्राचा पतपुरवठा आकसायला लागतो. याचा अर्थ आर्थिक चढउताराला (व्यापारी कालचक्राला) अनुकूल असा बँकांचा पतपुरवठा– म्हणजे तेजीत वाढत राहणारा व त्यामुळे तेजीला इंधन घालणारा तर मंदीत आकसत राहणारा मंदी धन करणारा–होत राहिलेला आहे. खरे तर, तो तेजीमंदीला आवर घालणारा असावयास हवा. तेजीतील वाढत्या किंमतीत मत्तेवर कर्ज देताना (वाढती) जोखीम कितपत आहे, हे ओळखून बँकांनी व्यवहार करणे आवश्यक आहे. बँका फाजील जोखीम घेणार

नाहीत, हे पाहावयाचे नियामकांचे काम आहे.

मंदीमध्ये मत्तेच्या किंमती घटत जातात. अशा वेळी बँक पतपुरवठा आकसू लागतात. पतपुरवठा कमी झाल्याने उद्योग अडचणीत येतात. बेकारी वाढते व मंदी धन बनत जाते.

तेव्हा तेजीमंदीस प्रोत्साहक वित्तपुरवठा होत राहू नये, हे नियामकांनी पाहावयास हवे. म्हणजे तेजीत वित्तसंस्था–बँका–आवाक्याबाहेर जोखीम घेऊन, कर्जदाराच्या कर्ज फेडण्याच्या ऐपतीचा विचार न करता, (सट्टेदारांनी) मत्तेच्या वाढत ठेवलेल्या किंमतींकडे दुर्लक्ष करून पतपुरवठा भरमसाठ करणार नाहीत आणि किंमती घसरत असता, घाबरून जाऊन, आवश्यक पतपुरवठा आकसत राहणार नाहीत, असे धोरण नियामकांनी आखाव्र्यास हवे, असे स्टिगलिट्झ आयोगाने सुचविले आहे. थोडक्यात, वित्त (पत) पुरवठ्याचे धोरण तेजीमंदीस भर घालणारे असू नये, ते तेजीमंदीला अटकाव करणारे असावे, असे आयोगाला वाटते.

वित्तसंस्थांनी–बँकांनी नेहमीच पुरेसे भांडवल राखावयास हवे. भांडवलाच्या प्रमाणात त्यांचा वित्त (पत)-पुरवठा असावयास हवा. आर्थिक पिछेहाटीच्या काळात होऊ शकणारे नुकसान सोसण्याइतका त्यांच्याकडे राखीव निधी असावयास हवा. तो तोकडा पडला आणि त्यासाठी त्या वेळी रोखे विक्रीस काढून भांडवल उभे करू म्हटले तर (रोख्यांचे भाव उतरत असल्याने आणि बाजारात उत्साह नसल्याने) ते करणे अशक्यप्राय होत असते. भरभराटीच्या काळात वाढत्या पतपुरवठ्यास लागणारे पर्याप्त भांडवल उभे केले पाहिजे, राखले पाहिजे, हे पाहण्याचे काम नियामकांचे आहे.

कर्जाऊ रकमेचे हप्ते तुंबू लागलेल्या वेळी जोखीम निर्माण होत नाही; तर कर्ज देतेवेळीच ती उभी असते. तेव्हा अशी जोखीम घेतेवेळीच ती अंगलट येणार नाही, यासाठी या योग्य अशा राखीव निधीची तजवीज करावी लागते.

जोखीम कमी करण्यासाठी एकाच क्षेत्रात, एकाच प्रकारच्या मत्तेवर पतपुरवठा न करता, तारणासाठीच्या मत्तेत विविधता राखणे सुज्ञपणाचे आहे. अशी विविधता राखली जाईल, हे नियामकांनी पाहावयास हवे. त्यामुळे वित्तीय क्षेत्राची स्थिरता व उपयुक्तता वाढत राहील.

योग्य ती जोखीम उचलल्याशिवाय बऱ्यापैकी परतावा, लाभ मिळत नाही. अशा वेळी अधिकाधिक लाभ उठवण्यासाठी अधिकाधिक जोखीम अंगावर घ्यावी असा मोह, हव्यास वाटू लागतो. २००७-०८ च्या वित्तीय अरिष्टापूर्वी रोख्यांच्यावर सालिना वीस टक्क्यांइतका परतावा अपेक्षित होता. वित्तीय क्षेत्रात इतका परतावा मिळायचा झाला तर १. स्पर्धेचा अभाव असावा लागतो, २. फाजील जोखीम घ्यावी लागते.[५] एवढ्या अपेक्षित परताव्याची काटेकोरपणे छाननी व्हावयास हवी व कडकपणे नियमन करावयास हवे. स्पर्धेचा अभाव असेल तर मक्तेदारी-विरोधी कायद्यांची कडकपणे अंमलबजावणी करावयास हवी. सरकारची हमी मिळत असल्यामुळे अतिरिक्त जोखीम घेतली जात असेल, तर नियामकांनी त्यावर निर्बंध लादावयास हवेत.

बँकांच्या व्यवस्थापकांच्या मोबदल्यावर नियामकांचे काटेकोर पर्यवेक्षण असावयास हवे. त्यांना सरकारचा भांडवली आधार मिळाला असेल, तर त्यातून व्यवस्थापकांना बोनस दिला जात नाहीना, हे पाहावे लागेल.[६] नियामकांनी त्यावर निर्बंध घालावयास हवेत.

बँकांनी रोख्यांच्या तारणावर सावधपणे कर्जे देऊ करावयास हवीत. रोखेबाजार अतिशय चंचल बनला असून त्यात अनपेक्षितपणे चढउतार होत असतात. रोख्यांच्या तारणात बँकांनी बरीच माया (मार्जिन) राखावयास हवी. तसेच मत्तांचे रोखेकरण, अनुजात वायदे रोखे, थकलेल्या कर्जांच्या देवाणघेवाणीचे व्यवहार (डेरीव्हेटिवज्, क्रेडिट डीफॉल्ट स्वॅपस्), ऋणकोला लुबाडणारे कर्जव्यवहार शक्यतो कमी करण्यावर, टाळण्यावर नियामकांनी भर द्यावयास हवा. या सर्वांतून बचत करणाऱ्याला, ऋणकोला नियामकांनी संरक्षण मिळवून द्यावयास हवे.

एखाद्या कर्ज-व्यवहारात जोखीम किती आहे, हे जोखणाऱ्या संस्था (अमेरिकेत) आहेत. ऋणकोबद्दल, तारण मत्तेबद्दल त्या माहिती पुरवतात. अशी माहिती पुरवण्याचा खर्च ऋणकोला करावा लागतो. यात बनवाबनवीस बराच वाव मिळू शकतो. कित्येकदा गुंतवणूक बँकांकडे पुष्कळसा निधी उपलब्ध असेल, तर ऋणको-

बद्दलची शिफारस करण्यास जोखीम जोखणाऱ्या संस्थांना गुंतवणूक बँकाच प्रवृत्त करतात. २००७-०८ मधील अरिष्टाचे हेही एक कारण होते. तेव्हा त्यांच्यावर नजर ठेवण्याचे काम, त्यांना शिस्त लावण्याचे काम नियामकांनी नेटकेपणे करावयास पाहिजे.

वित्तीय क्षेत्रात नुसत्या बँकाच येत नाहीत.[७] रोखे-बाजार, भांडवल बाजार इ. खरेदीविक्रीचे व्यवहार करणाऱ्या संस्था येतात. त्यांचे नियमन, पर्यवेक्षण त्यासाठीच्या वेगळ्या नियामक संस्थांना करावयास हवे.

खुल्या बाजारात तर्कनिष्ठ अभिकर्ते स्वयंशिस्त पाळतात, हा सिद्धान्त चुकीचा ठरला असून, सर्वांना सर्वप्रकारची संपूर्ण माहिती नसते व त्यामुळे बाजार चुकतो व वित्तीय क्षेत्रात घोटाळे होत राहतात. आणि म्हणून सरकारने वेळीच हस्तक्षेप करून, वित्तीय बाजाराचे नियमन करावयास हवे, हा २००७-०८ च्या वित्तीय अरिष्टाचा धडा आहे, हे विसरता कामा नये.

राष्ट्रांतर्गत तसेच आंतरराष्ट्रीय वित्तीय क्षेत्रातदेखील शिस्त राखणारी नियामक संस्था- (आंतरराष्ट्रीय) 'नवीन मध्यवर्ती बँक' - असावी असे स्टिगलिट्झ आयोगाने सुचविले आहे.[८] नवीन मध्यवर्ती बँक समष्टी अर्थ-व्यवहारातील समस्यांवर तोडगा शोधण्याचे कार्य करेल. व्यष्टी अर्थव्यवहारातील समस्यांच्या अभ्यासासाठी वेगळे 'वित्तीय नियामक प्राधिकरण' असावे अशी त्याने शिफारस केली आहे. या दोन्ही संस्था समन्वयाने कार्य करतील. वित्तीय नियामक प्राधिकरणाखाली अनेक उपआयोग असतील. त्यात रोखे व विनियम आयोग, विमा आयोग, वित्तीय साधनांची-पत्रांची-सुरक्षा आयोग, लेखा पर्यवेक्षण आयोग, वित्तीय व्यवस्थेची स्थिरता आयोग यांचा समावेश असेल. हा स्थिरता आयोग संस्थासंस्थांमधील आंतर-संबंधांचा, आणि एका वित्तीय संस्थेला बसलेल्या फटक्याचा दुसऱ्या वित्तीय संस्थेला बसू शकणाऱ्या धोक्याचा विचार करेल. तो तारण ठेवून घेताना चढ भाया (मार्जिन) राखली जावीसा किंवा वस्तू-विक्रीच्या रकमेपैकी मोठ्या प्रमाणाने रोख रक्कम घेतली जावीसा आग्रह धरू शकेल. लेखा पर्यवेक्षण आयोगाचे एखाद्या उद्योगाने पुरविलेली माहिती अचूक आहे ना, दिशाभूल करणारी नाही ना, एकंदरीने त्या उद्योगाच्या दृढतेबद्दलचा अंदाज योग्यपणे वर्तविलेला आहे ना, हे पाहण्याचे काम राहील. तो उद्योग नियमांना गुंडाळीत नाही व तो हिशोबाचे मानक चांगल्या प्रकारे पाळत राहील, हेही पाहण्याचे काम लेखा पर्यवेक्षक आयोगाचे असेल.

अशा या सगळ्या जागतिक स्तरावरच्या संस्थांमधून समन्वय साधणारी आणि संयुक्त राष्ट्रसंघातील (१९२) सभासदांचे प्रतिनिधित्व करणारी पण आटोपशीर अशी एक नवीन सर्वोच्च संस्था स्थापन करावयास हवी, असे स्टिगलिट्झ आयोगाने सुचविले आहे. 'जागतिक आर्थिक समन्वय सभा' (ग्लोबल[९] इकॉनॉमिक कोऑर्डि-नेशन कौन्सिल) असे तिला म्हटले आहे. आंतरराष्ट्रीय तज्ज्ञ मंडळींचा तिला सल्ला व आधार राहील.

नवीनच संस्था हवी. याचे कारण सध्या अस्तित्वात असलेल्या संस्था, उ. आंतरराष्ट्रीय नाणेनिधी, सध्याचे वित्तीय व इतर प्रश्न सोडविण्यास कमी पडल्या आहेत. उलट, १९९७-९८ च्या पूर्व आशियातील अरिष्टास त्या कारणीभूत झाल्या. जागतिकीकरणाच्या आजच्या प्रयोगात राष्ट्रीय पैशाचे धोरण व वित्तीय क्षेत्राचे नियमन यापलीकडे जाऊन व्यापार व वित्तीय क्षेत्रात सहकार्य व जागतिक नियमन करण्याची आवश्यकता आहे. तसेच दारिद्र्य घालविण्यासाठी आणि २०००साली मान्य केलेली 'सहस्रकी विकास उद्दिष्टे' गाठण्यासाठी सर्व जगाने एकत्रपणे प्रयत्न करावयाचे आहेत. पर्यावरणाचा होत राहिलेला नाश व पृथ्वीचे वाढते तापमान थोपविण्यासाठीही जागतिक सह-कार्याची गरज आहे. हे लक्षात घेऊन त्यासाठी 'जागतिक आर्थिक समन्वय सभे'सारखी नवीन संस्था स्थापणे अपरिहार्य आहे. त्यात ग-७, ग-२० अशा संकुचित राष्ट्रगटांचे मंडळ न राखता उर्वरित १७० राष्ट्रांचे प्रतिनिधी भाग घेतीलशी व्यवस्था उभी करावयास हवी.

नवीन संस्था उभी करण्याचे काम वेळकाढू आहे. तेव्हा जागतिक आर्थिक प्रश्नांचा विचार करून त्यावर तोडगा शोधणारे आंतरराष्ट्रीय तज्ज्ञांचे मंडळ तत्काळ स्थापिले जावे, असे स्टिगलिट्झ आयोगास वाटते, जागतिक संस्थांच्या व्यवस्थापनात अनुस्यूत असणाऱ्या जोखिमी लक्षात घेऊन (जोखिमींची प्रत ठरविणारे निकष कोणते हवेत इ.) त्यांचा परिहार कसा करावा, हे आंतरराष्ट्रीय तज्ज्ञमंडळ सुचवेल.

आंतरराष्ट्रीय वित्तीय क्षेत्रात सध्या राखीव निधींचा कळीचा प्रश्न पुढे आला आहे. दोन वित्तीय अरिष्टे सोसल्यामुळे त्यापासून बचाव करण्यासाठी विकसनशील देशांनी जास्तीत जास्त (विदेशी चलनात) राखीव निधी बाळगण्याचे धोरण स्वीकारले आहे. त्यांच्या राखीव निधीचे प्रमाण २००७ साली त्यांच्या स्थूल आंतरदेशीय उत्पादिताच्या २६.४ टक्के होते. तेच आर्थिक सहकार व विकास संघटनेचे (ओईसीडीमधील प्रगत देशांचे) ४.८ टक्के होते.[१०] सामान्यपणे तीन ते सहा महिन्यांची आयात होऊ शकेल इतका निधी बाळगल्यास पुरे असते. त्याहून हे प्रमाण जास्त आहे. ते कमी करावयास हवे.

यात आणखी एक गोम आहे. १९७१ पासून अमेरिकेने सोन्यात ठरविलेले डॉलरचे मूल्य झुगारून दिले. व डॉलरचे मूल्य नम्य राखले. त्याचा प्रतिकूल परिणाम विकसनशील देशांच्या विदेशी व्यापारावर होत आहे. तेव्हा डॉलरऐवजी बहुविध चलनपद्धती असावी, असा विचार सुरू आहे.

आंतरराष्ट्रीय नाणेनिधीने 'विशेष आहरण अधिकार' (एस् डी आर्-स्पेशल ड्रॉइंग राइट्स) नावाचे नवे हिशेबी चलन वापरावयास सुरुवात केली आहे. पाच प्रबळ देशांच्या चलनांचे मूल्य ठरावीक प्रमाणाने एकत्र करून त्याची सरासरी काढून जे मूल्य येईल, ते एस्. डी. आर्. मूल्य असे ठरविले गेले आहे. सरासरीत दररोज जसा बदल होईल, तसे एस्. डी. आर्. चे मूल्यही बदलत राहते. अशा तऱ्हेची काही व्यवस्था निर्माण करावी, असे आयोगास वाटते.

अलीकडेच एस्. डी. आर्. चा नाणेनिधीचा साठा २५० अब्ज डॉलर्सने ग-२० (वीस देशांच्या गटाने) देशांनी वाढविलेला आहे. पण त्यासाठी ग-२० देशांचे एकमत व्हायला हवे. म्हणजे एस्. डी. आर्. चा साठा वाढविण्यासाठी नाणेनिधीला त्यांच्यावर अवलंबून राहावे लागते. नाणेनिधीचा साठा वाढविण्याचे स्वातंत्र्य नाही. त्यात परिस्थितीनुसार, मागणीनुसार, देशांच्या अडचणीनुसार लवचीकपणा राखता येत नाही. ही अडचण आहे. ती नाहीशी करावयास हवी.

नाणेनिधीचा एस्. डी. आर्.चा साठा वाढला तर त्याचे त्यास सभासदराष्ट्रांच्या वाट्यानुसार (कोट्यानुसार) वाटप करावे लागते. मूळ कोट्यामुळे प्रगत व विकसनशील देशांतून जी विषमता निर्माण झाली आहे, ती विषमता तशीच पुढे राहते. प्रगत देशांना वास्तविक या साहाय्याची अल्पशी किंवा मुळीच गरज नसते. पण विकसनशील देशांची गरज भागविण्यासाठी रक्कम तोकडी पडते. शिवाय त्यांच्यावर नाणेनिधी बऱ्याच अटी घालत असल्याने मदत घेण्यास ते टाळाटाळ करू पाहतात. म्हणजे त्यांच्या अडचणी निवारण्यास त्यांना वेळेवर साहाय्य उपलब्ध होत नाही.

या साऱ्या अडचणी व नाणेनिधीचे परावलंबित्व लक्षात घेता नाणेनिधीचा फारसा उपयोग झालेला नाही. म्हणून आयोगाचे म्हणणे असे, की पूर्ण रोजगारी आणण्यासाठी, प्रभावी मागणी वाढविण्यासाठी, दारिद्र्य नाहीसे करण्यासाठी, संयुक्त राष्ट्रसंघाची सहस्रकी विकास उद्दिष्टे गाठण्यासाठी लागणारा पैसा पुरविणारी नवीन वेगळी संस्था हवी. ती जागतिक मध्यवर्ती बँक (राखीव निधी संस्था) असेल.

जागतिक मध्यवर्ती बँक जे चलन प्रसृत करेल, ते सर्व राष्ट्रांनी मान्य करावयास हवे. आणि ते स्वीकारून सर्व राष्ट्रांच्या रिझर्व बँकांनी आपले चलन द्यावयास हवे. हे चलन एस्. डी. आर्. सारखे असेल किंवा आंतरराष्ट्रीय चलन प्रमाणपत्र (इंटरनॅशनल करन्सी सर्टिफिकेट्स) या स्वरूपात असेल, असे चलन किती असावे. हे देशांच्या विकासाचा सालिना दर, अल्पमुदतीतील प्रतिकूल व्यापाराचे प्रमाण, देशांची विदेशी चलनाची मागणी इत्यादींवरून ठरविता येईल– किंवा जागतिक मध्यवर्ती बँकेने वर्षाला किती कर्जसाहाय्य द्यावयाचे याची वरची मर्यादा ठरवून त्यानुसार किती चलन निर्माण करायला जागतिक मध्यवर्ती बँकेस मुभा द्यावी, हे ठरविता येईल.

ज्या राष्ट्रांना कर्जसाहाय्याची जरुरी नाही (आणि यात बहुतेक सर्व विकसित राष्ट्रे मोडतात), ज्यांचा (नव्या चलनातील) वाटा न वापरता राहिला आहे, तो त्यांची ठेव अशी मानून त्यावर व्याज देता येईल व जे कर्जसाहाय्य घेतात त्यांना व्याज आकारून जागतिक मध्यवर्ती बँकेचा व्यवस्थापनाचा खर्च चालविता येईल.

जागतिक मध्यवर्ती बँकेचे कार्य कोणते असावे, कसे चालवावे, यात राष्ट्रांचा वाटा कसा ठरवावा (तो

प्रत्येकाने दिलेल्या भांडवलवाट्यावर न बेतता, एकूण स्थूल राष्ट्रीय उत्पादितात प्रत्येक राष्ट्राचा किती भार आहे (प्रमाण आहे), त्यांची त्यांची विदेशी चलनाची किती गरज व मागणी आहे यावरही बेतता येईल.) जागतिक मध्यवर्ती बँकेला चलन निर्माण करायला कशी व कितपत मोकळीक द्यावी, हे सारे तपशिलाचे प्रश्न आहेत. मुळात, जागतिक मध्यवर्ती बँक ही नव्याने उभी करावयाची का हे कार्य आंतरराष्ट्रीय नाणेनिधीकडे सोपवावयाचे आणि ते तसे सोपवावयाचे झाल्यास नाणेनिधीच्या व्यवस्थापनात, शासनात कशी सुधारणा करावयाची (या बाबतीत आयोगाने स्थापिलेल्या उपसमितीने सुचविलेल्या सुधारणा कशा व कितपत अमलात आणावयाच्या) या प्रश्नांचा विचार सर्व विकसित, विकसनशील व मागास राष्ट्रांनी मिळून करावयाचा आहे. या साऱ्यासाठी विकसित राष्ट्रांचे नेतृत्व, विकसनशील व मागास राष्ट्रांना बरोबर घेऊन जाण्याची वृत्ती हवी आहे. शेवटी, हा सर्वांच्याच इच्छाशक्तीचा प्रश्न आहे. अन्यथा वित्तीय अरिष्टे ही अशीच येत राहणार, आजवर त्यांचे फटके खात आलो आहोत व हे असेच चालावयाचे म्हणून निष्क्रिय बसावयाचे की काय? हेही ठरवावे लागेल.

**संदर्भ :**


१. Rana Forootar (2011) : Don't hold your Breath, Time Magzine 21/6/2011.

२. Stiglitz Report (2010) : Reforming The International Monetary and Financial Systems in the wake of the Golbal Crisis.

३. Final Report of the Committee on IME Governance Reform (Chairman Trever Manuel, Minister of Finance, Republic of South Africa) [March 24, 2009].

४. खेर सी. पं. (२०११) : वित्तीय अरिष्टे, स्वरूप व उपाय दिलीपराज प्रकाशन, पुणे.


**तळटीपा :–**

१. राजा फॉरूटर, (२०११) पृ. २१–२२.

२. स्टिगलिट्झ रिपोर्ट (२०१०).

३. ट्रेव्हर मॅन्युएल (२००९) यांच्या अध्यक्षतेखालील आंतरराष्ट्रीय नाणेनिधीच्या शासनात करावयाच्या सुधारणांसंबंधातला अंतिम अहवाल. स्टिगलिट्झ आयोगाने जे चार उपगट नेमले, त्यांपैकी या गटाचा तेवढा वेगळा अहवाल उपलब्ध झाला. बाकीच्यांचा आयोगाच्या संपूर्ण अहवालात समाविष्ट आहे.

४. एस्. डी. आर्. वाढविण्यास चोवीस राष्ट्र-गटांची संमती मिळविण्यात वेळ मोडतो. तेव्हा आशियातील 'आशियान + ३' राष्ट्रगटाने उभी केलेली, "चिअँग माई आरंभ" असे जिला संबोधिले जाते, ती व्यवस्था लगेच अमलात आणता येऊ शकेल. या योजनेने आशियान + ३ या गटातील देशांना तात्पुरत्या विदेशी येणेदेणेपायी किंवा रोकडीची चणचण भासत असता येणाऱ्या अडचणीपायी त्यांच्या मध्यवर्ती बँकांनी एकत्र येऊन परस्परांना वित्तीय साहाय्य करावयाचे ठरविले. अशा तऱ्हेची पर्यायी योजना अन्य राष्ट्रगटांनाही करता येऊ शकेल, असे स्टिगलिट्झ आयोगाने सुचविले आहे. [स्टिगलिट्झ आयोगाचा अहवाल, (२०१०), पृ. १७४ आणि रीजनल इकॉनॉमिक इंटिग्रेशन इन् ईस्ट एशिया : चिअँग इनिशिएटिव्ह (गुगलवरून)].

५. आयोग अहवाल, पृ. ८८.

६. बुश प्रशासनाने बँकांना ७०० अब्ज डॉलर्सचे जमानत साहाय्य देऊ केले होते. त्यातून त्या छोट्या व मध्यम उद्योगांना कर्जपुरवठा करतीलशी अपेक्षा होती. बँकांची पुनर्रचना केली जाईल, असा भरवसा होता. परंतु बँक व्यवस्थापक आणि कर्मचारी यांनी प्रथम आपापला अधिलाभांश घेऊन ते (निर्लज्जपणे) मोकळे झाले. [पहा : खेर (२०११), पृष्ठे ११०–११].

७. बँकांच्या व्यवहारात शिस्त राखणारी बेसल I व बेसल II ची नियमावली स्वित्झर्लंडमधील बेसल या शहरात जमलेल्या १० देशांच्या (ग–१०) गटातील मध्यवर्ती बँकांच्या गव्हर्नरांच्या व वित्तमंत्र्यांच्या बैठकीत ठरविण्यात आली असून तिचा स्वीकार सर्व राष्ट्रांनी करावयाचा आहे. [पहा खेर (२०११), पृष्ठे १२४–१३१].








८. उपरोक्त, पृ. १०८-१०९.
९. ग्लोब म्हणजे विश्व असा अर्थ केला गेला आहे. ग्लोबल म्हणजे वैश्विक. मराठीत विश्वाचा अर्थ पृथ्वी, तारे, नक्षत्रे इ. सारी सृष्टी, असे आपण मानतो. तो इथे लागू पडत नाही. म्हणून मी जागतिक अशी परिभाषा वापरली आहे.
१०. उपरोक्त, पृ. १६८.

☆☆☆

## लेखकांचा परिचय

❋ **डॉ. सौ. सरोजा भाटे**
पुणे विद्यापीठातील संस्कृत विषयाच्या निवृत्त प्राध्यापिका; संस्कृत व्याकरण व अन्य विषयांवर १० पुस्तके व ५० हून अधिक लेख प्रकाशित.
***पत्ता :–*** 'क्रतु', निर्मल बाग, १५/४६ पर्वती पेठ, पुणे ४११ ००९. दूरध्वनी : ०२०-२४२२६८५४.

❋ **श्री. बाबूराव चंदावार**
समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक
***पत्ता :–*** सईनगर २, डी. १, फ्लॅट – १३, सिंहगडरोड, पुणे – ४११ ०३०.

❋ **श्री. सी. पं. खेर**
क्रांतिकारी अर्थशास्त्रज्ञ जॉन मेनार्ड केन्स्, सौ. कुसुम खेर, पुणे (१९९७); राज्यार्थ शास्त्रज्ञ जॉन केनेथ गालब्रेथ, दिलीपराज प्रकाशन, पुणे (१९९९) व जागतिक अर्थशास्त्राचे बदलते संदर्भ, दिलीपराज प्रकाशन, पुणे (२००४) ही पुस्तके प्रसिद्ध.
***पत्ता :*** बी-७ (पूर्व) वृंदावन सोसायटी, रेंज हिल्स रोड, पुणे ४११ ०२०. दूरध्वनी : ०२२-२५५४०१८२.

❋ **प्रा. विश्वनाथ शिंदे**
प्राध्यापक व प्रमुख, मराठी विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर – ४१६ ००४.
***पत्ता :*** मराठी विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर – ४१६ ००४. दूरध्वनी : ०२३१-२६०९२१३.

❋ **डॉ. माधवी देसाई**
एम. ए. पीएच.डी.; शिक्षणमहर्षी बापूजी साळुंखे महाविद्यालय, कराड येथे वरिष्ठ विभागाच्या मराठी विषयाच्या प्राध्यापिका.
***पत्ता :*** ४०४, खणभाग, जुने स्टेशन रोड, सांगली – ४१६ ४१६. भ्रमणध्वनी : ९३२५०६३६०६.

# एका कवितेची पासष्टी

डॉ. माधवी देसाई

नवकवितेचे अध्वर्यू कविवर्य बा. सी. मर्ढेकर यांची काव्यदृष्टी स्वतंत्र आणि पृथगात्म होती. कवी आणि समीक्षक या दोन्ही भूमिकांतून त्यांनी मराठी साहित्यात 'नवता' आणली. त्याचे मोल वादातीत आहे. आपण नवकवितेचे अध्वर्यू म्हणून प्रस्थापित व्हावे यासाठी मर्ढेकरांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष प्रयत्न कधीच केले नाहीत; उलट, नवकवी म्हणून त्यांनी बालकवींचा उल्लेख केला, यातच त्यांचे मोठेपण आणि वाङ्मयप्रेम दिसून येते. मर्ढेकरांची समग्र कविता वाचल्यानंतर त्यांच्यातील अस्सल प्रतिभावंताचे दर्शन घडते. त्यांना अखिल मानवजातीबद्दल वाटणारी कणव जाणवते. संतपरंपरेशी नाते सांगणारी त्यांची कविता त्यांच्याबद्दलचा आदर द्विगुणित करते. त्यांच्या 'फलाटदादा, गणपतवाणी, दवांत आलीस ...., या गंगेमधि ...., नव्या मनूचा गिरिधर पुतळा ...., बोंड कपाशीचे .... अशा सर्वच कविता खास मर्ढेकरी आहेत. परंतु मर्ढेकरांच्या 'पिपांत मेले ओल्या उंदिर ...' या कवितेने इतिहास घडविला. कारण या कवितेविषयी स्तुती, उपरोध, निंदा, दुर्बोध कविता आणि खिल्ली उडविली जाणे अशा सर्व प्रकारच्या प्रतिक्रिया उमटल्या. या कवितेविषयी खंडनमंडनात्मक इतके लेखन, इतकी चर्चा झाली की, इतकी चर्चा क्वचितच एखाद्या कवीची आणि कवितेची झाली असेल.

१९४६ साली ही कविता जन्मली आणि आता २०११ साल आहे; म्हणजे बा. सी. मर्ढेकरांच्या 'पिपांत मेले ओल्या उंदिर' या कवितेला ६५ वर्षे झाली. या कवितेची 'पासष्टी' साजरी करण्याचे हे वर्ष आहे. कवीने कविता करून रसिकांसमोर ठेवली की रसिक, समीक्षक आपापल्या परीने त्या कवितेचा अन्वयार्थ लावतात. एकाच कवितेतून वाचकसापेक्ष अनेक अर्थ निघू शकतात. कविता जर व्यंग्यार्थाने संपृक्त असेल, तरच हे शक्य होते. मर्ढेकरांची प्रतिभा तर कवितेत व्यंग्यार्थाने संपृक्त प्रतिमा योजण्यात निष्णात होती. त्यामुळे त्यांच्या कवितेतून अनेकार्थ सूचित होतात. 'पिपांत मेले....' या कवितेचेही अनेकांनी अर्थ लावण्याचे प्रयत्न केले. शरीरशास्त्रापासून, समाजशास्त्रापर्यंत आणि कष्टकरी माणसांपासून सैनिकांपर्यंत सर्व प्रकारचे अर्थ कवितेत शोधले गेले. त्यातून लावलेल्या अन्वयार्थावरही चर्चा झाली.

बा. सी. मर्ढेकरांच्या कवितेकडे माझी पाठच होती. पीएच. डी. च्या संशोधनाभ्यासाच्या काळात माझा डॉ. द. भि. कुलकर्णीसरांशी परिचय झाला. त्यांनीच मला 'मर्ढेकरीकविताभिमुख' केले. मी मर्ढेकरांची कविता पुन्हा पुन्हा वाचली. पु. शि. रेगे यांच्या कवितेच्या अभ्यासाच्या ओघात आणि संशोधनाभ्यासाच्या निमित्ताने मर्ढेकरांची कविता अभ्यासणे आवश्यक असल्याने मी मर्ढेकरांच्या सर्व कविता पुन्हा पुन्हा वाचल्या. 'पिपांत मेले .....' ही कविता शाळकरी वयात वाचलेली; पण तेव्हा ती मुळीच समजली नव्हती; त्यामुळे या कवितेशी मी घुटमळले. संशोधनलेखन थोडे बाजूला ठेवून मी २००८ मध्ये या कवितेविषयी लिहिले. मर्ढेकरांच्या कविता वाचल्या होत्या; पण त्यांबाबतची समग्र समीक्षा वाचली नव्हतीच. म्हणून ते लेखन कोणत्याही समीक्षेचा प्रभाव नसलेले होते. मी पुन्हा माझ्या प्रबंधलेखनात गुंतले. तोपर्यंत जुलै २००९ मध्ये प्रा. एस. एस. नाडकर्णी यांनी 'पिपांत मेले ओल्या उंदीर' या कवितेबद्दलच्या सर्व प्रतिक्रिया, समीक्षात्मक लेखन, पत्रोत्तरे इ. एकत्र करून त्या कवितेचा व समीक्षेचा स्वतःही परामर्श घेऊन 'पिपांत मेले ओल्या उंदीर' हे पुस्तक प्रसिद्ध केले. त्यात या कवितेबद्दलची बहुतांश समीक्षा अभ्यासकांना एकत्र उपलब्ध होते, ही या पुस्तकाची मौल्यवान बाजू आहे.

या वर्षी 'पिपांत मेले ओल्या उंदीर' या कवितेची 'पासष्टी'. त्या निमित्ताने या कवितेविषयी ....

बा. सी. मर्ढेकरांनी जी नवकविता लिहिली, त्यातून ईश्वराचे सार्वभौम अस्तित्व आणि सर्वसत्ताधीशपण जाणून

त्याच्या भेटीची आस आणि ओढ व्यक्त करताना ते लिहितात,

"किती पायी लागू तुझ्या। किती आठवूं गा तूंते;
किती शब्द बनवूं गा। अब्द अब्द मनीं येते"
(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ १०६)

ईश्वराच्या भेटीची आस आहे; पण त्याचे अंतिम सार्वभौमत्व मान्य करून ते म्हणतात,

"हासडल्या तुज शिव्या तरीहि
तुझ्याच आलो पायीं लोळत;
मुठीत धरूनी नाक, लाविले
तव डोळ्यांशी डोळे पोळत."
(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ ११५)

असे म्हणून ईश्वराला शरण जाणाऱ्या मर्ढेकरांनी अखिल मानवजातीबद्दल वाटणारी आत्मीयता, मानवी जीवनातील अगतिकता, जीवनमूल्यांचा झालेला ऱ्हास, मानवी जीवनाला आलेले रूक्ष यांत्रिकपण, मानवी देहाला आलेले हीन क्षुद्रत्व, अटळ मृत्यू यांवरही कविता लिहिली. बेसुमार, अमाप वाढलेली लोकसंख्या, गर्दी, बेकारी, दैन्य, दारिद्र्य आणि या मूल्यहीन गर्दीच्या बजबजपुरीत माणसाची जगण्यासाठीची क्षुद्र धडपड, क्षुद्र तडजोडी आणि मूलभूत गरजांसाठी करावी लागणारी ऊरफोड, प्रदूषित वातावरण, प्रदूषित विचार, प्रदूषित संस्कृती आणि यांत जगणारी रोगट मनाची माणसे संवेदनशील मर्ढेकरांच्या कवितेचा विषय बनली. 'पिपांत मेले ....' या कवितेचा वर्ण्यविषयही माणसेच .... काही अपवाद वगळता ... बहुतेकांनी हे मान्य केले आहे.

प्रभाकर पाध्ये यांनी या कवितेविषयी केलेली समीक्षा काव्यशास्त्रापासून कवितेत व्यक्त झालेल्या तत्त्वज्ञानापर्यंत सर्वस्पर्शी आहे; शिवाय कलाकृतीपासून मिळणाऱ्या आनंदाबद्दलही त्यांनी समीक्षेच्या नजरेतून सांगितले आहे. ते लिहितात, "ही कविता तशी फारशी वरच्या दर्जाची नाही.... पण तिच्यात एक वैशिष्ट्य आहे. आणि ते मला महत्त्वाचे वाटते. ते म्हणजे तिचे पृथगात्मत्व. तिचे अनन्यसाधारणत्व."[१] ही कविता मुंबई शहरातील किंवा महानगरीय जीवनशैलीशी निगडित असल्याचे त्यांनी सूचित केले नाही.

प्रभा गणोरकरांनी मर्ढेकरांच्या निवडक कवितांचे अर्थविवेचन करून 'पिपांत मेले ओल्या ....' या कवितेच्या अनुक्रमांकाचा संदर्भ वीस आणि एकविसाव्या शतकातील मानवी जीवनशैलीशी जोडला आहे; त्याचबरोबर 'शुभ्र-तिमिर-मोहक-वसना ....' या कवितेच्या विरोधात या कवितेच्या आशयाला उठाव येतो, असे त्या सांगतात. उंदीर म्हणजे बिळात उंदराप्रमाणे जगणारी माणसेच आहेत. महानगरीय जीवनातील मानवी अस्तित्वाचे धिंडवडे मर्ढेकरांनी आपल्या कवितेत मांडलेत; परंतु ही कविता मुंबई शहरापुरतीच मर्यादित नसून संपूर्ण महानगरीय जीवनाबद्दल ती आहे, असे मत त्या मांडतात.

म. वा. धोंडांनी आपल्या लेखामध्ये 'उंदीर' ही प्रतिमा कोणत्या आणि कोणाच्या संदर्भात आली असावी, याबाबत काही प्रश्न उपस्थित केले आहेत; आणि शेवटी उंदीर ही प्रतिमा माणसांसाठीच असल्याचे सांगून जॉन स्टाईनबेकच्या कादंबऱ्यांचा संदर्भ दिला आहे; आणि थोड्या विवेचनानंतर उंदीर म्हणजे, "... परंतु जे केवळ दैनिक कमाईवरच जगतात असेच बिगारी, हमाल, फेरी-वाले, चांभार, बुटपॉलिशवाले ... हेच ख़रे शहरी उंदीर ! मर्ढेकरांना हेच अभिप्रेत असावेत."[२] अशी उंदीरप्रतिमेची रूपरेषा सांगितली आहे. पण ओली पिंपे म्हणजे तेलाची रिकामी पिंपे पाण्यासाठी आणि दारूसाठी वापरतात म्हणून ओली पिंपे ... आणि वर उल्लेखलेले शहरी उंदीर रोजच दारू पिऊन पडतात म्हणून ओल्या पिंपात ... वगैरे वगैरे. पण हा अन्वय तार्किक दृष्ट्या जुळत नाही. कारण मर्ढेकरांच्या कवितेतील उंदीर 'ओल्या पिंपात' मरतात; मग ते पिंप पूर्वी तेलाला वापरीत असावेत किंवा कशालाही. ...तो मुद्दा गौण आहे. इथे म. वा. धोंडांनी मुंबई शहराचा नामोल्लेख केला आहे.

सुधीर रसाळ यांनी 'ओले पिंप' आणि 'बीळ' या दोन्हींचे विश्लेषण केले आहे. ते लिहितात, "या कवितेतील 'गरिब विचारे' उंदीर 'बिळात' जरी जगले असले, तरी त्यांना मरण मात्र 'पिंपात' आले आहे 'बीळ' आणि 'पिंप' ही जणू उंदराची दोन जगेच ..."[३] सुधीर रसाळांनी 'बीळ' हे उंदराचे घर आणि 'पिंप'ही त्यांची अन्न मिळविण्यासाठीची कर्मभूमी आहे, असे सांगितले आहे. आधुनिक माणूसही असाच उंदरासारखा बिळात राहून भूक भागविण्यासाठी चोरटेपणाचा मार्ग स्वीकारणारा,

भित्रा, सर्वभक्षक आणि अमाप जनन करणारा लिंगवेडा आहे. तो अगतिक, केविलवाणा आहे असे सांगितले आहे. त्यांनी मुंबई शहराचा उल्लेख केला नाही; पण पृथ्वीलाच ओले पिंप म्हटले आहे; ते पटतेही.

रमेश तेंडुलकरांनी उंदीरप्रतिमेचे विश्लेषण केले आहे; आणि शहरी जीवन आणि संस्कृतीशी संबंधित अनेक भांडवलदार, व्यापारी, कामगार यांच्यासह हमाल इत्यादींचाही समावेश लहानमोठ्या, लठ्ठ-बारीक उंदरांत केला आहे. उंदीर या प्रतिमेत अनेकार्थता, व्यामिश्रता आणि संदिग्धता असल्याचे तेंडुलकर सांगतात. पण या कवितेपेक्षा मर्ढेकरांच्या या कवितेनंतरच्या कवितांमधून मुंबई शहरातील जीवनाचा आशय प्रकट होऊ लागला, असे मत ते मांडतात. तेंडुलकरांना केवळ कष्टकरी व चाळीत, झोपडपट्टीतून राहणारीच माणसे 'उंदीर' या प्रतिमेत अपेक्षित नाहीत, तर त्या प्रतिमेत सर्वच माणसांचा समावेश ते करतात. म्हणजेच इथे 'उंदीर' ही प्रतिमा 'उंदीरवृत्ती' सूचकार्थ व्यक्त करणारी आहे.

सतीश तांबे हे मर्ढेकर दुसऱ्या महायुद्धातील अमानुष विध्वंसाने अस्वस्थ झाल्याचा संदर्भ देत कवितेचा अन्वयार्थ लावतात; म्हणून ते लिहितात, "महायुद्धाच्या मरणकळेमुळे अस्वस्थ झालेल्या मर्ढेकरांना 'येन केन प्रकारेण' उंदीर मारण्याच्या प्रकाराने अस्वस्थ केले असावे. .. त्यामुळे विषप्रयोग व तत्सम क्रियेने एकसाथ मेलेले अनेक उंदीर पाहून मर्ढेकर अस्वस्थ होतात. त्यात त्यांना मानवी जीवनाचे प्रतिबिंब दिसते."[४] पुढे सतीश तांबे यांनी 'ओले पिंप' या प्रतिमेचा अन्वय लावताना जीवन म्हणजे पाणी, हा 'जीवन' शब्दाचा पर्यायी अर्थ घेऊन 'ओले पिंप' म्हणजे जीवन असा प्रतिकार्थ घेतला आहे; परंतु हा दूरान्वय वाटतो. तांबे यांनीही मुंबई शहराचा स्पष्ट संदर्भ न घेता मानवी जीवनाची व्यर्थता आणि शोकांतिका या कवितेत असल्याचे सांगितले आहे.

वसुंधरा तारकर यांनीही दुसऱ्या महायुद्धातील घटना, उलथापालथ, मानवी संहार यांचा संदर्भ देऊन वांझ, क्षुद्र, अर्थहीन, मूल्यहीन, संज्ञाहीन, सडलेले, भित्रे, लाचार जीवन हे उंदरासारखेच आहे आणि आजचा माणूस द्विपाद पशुतुल्य आहे असे मर्ढेकरांना वाटते, असा अर्थ त्या सांगतात. सुधीर रसाळांनी जे अर्थविश्लेषण आणि अन्वय सांगितले आहेत, त्याच्याजवळ जाणारे विश्लेषण वसुंधरा तारकरांचे आहे.

निशिकांत ठकारांनी, 'पिपांत मेले ....' या कवितेला दुसऱ्या महायुद्धाची पार्श्वभूमी असल्याचे सांगितले आहे. साम्राज्यवाद व वसाहतवादाच्या आक्रमणाने बिळातले उंदीर पिपात आले असे ते सांगतात; पण म्हणजे उंदीर नेमके कुठून कुठे आले ते सांगत नाहीत; पण लेखाच्या शेवटी जे 'मूषकमहानिर्वाणाचे सक्तिसूक्त क्रमांक सहा'-मध्ये ते लिहितात, " 'पिपात मेले ....' ही कविता वाचल्यानंतर या गोविंद गोपाळांसारखीच अवस्था होऊन जाते. भूक मरून जाते. भुका मरून जातात. ... उचकी देऊन मेलेले उंदीर डोळ्यांपुढून हलायला तयार नसतात. कविता अजूनही संपायला तयार नाही."[५] निशिकांत ठकारांची जी अवस्था झाली आहे, तशीच अवस्था माझ्यासह अन्य कविताप्रेमींचीही होणे शक्य आहे.

द. भि. कुलकर्णी हे मर्ढेकरांचे भक्त आहेत. मर्ढेकरांच्या कवितेविषयी, समीक्षेविषयी ते भान हरवून बोलतातही आणि साक्षेपाने लिहितातही. असे असूनही दभिसरांना 'उंदीर' ही प्रतिमा 'सैनिक' या अर्थाने मर्ढेकरांनी वापरली आहे हा अन्वयार्थ, लक्षणार्थ आणि व्यंग्यार्थही स्वीकारार्ह वाटत नाही. परंतु 'घाऱ्या डोळी' म्हणजे मांजराच्या डोळी हा अन्वयार्थ स्वीकारार्ह आहे.

अक्षयकुमार काळे यांनी ·बेकलाइटीचे विश्लेषण चांगले केले आहे. परंतु विजया राजाध्यक्ष यांनी – "(हे मधाळ पोळे म्हणजे उंदराभोवती घोंघावणाऱ्या माशांचे पुंजके)"[६] हा लावलेला 'मधाळ पोळे' या प्रतिमेचा अर्थ अगदीच अनुचित वाटतो.

विद्या प्रभुदेसाई यांनी मुंबई शहराचा स्पष्ट उल्लेख करून बिळाकडून पिंपात उंदीर येतात म्हणजे गावाकडून मुंबईकडे, मुंबईच्या दिखाऊ आकर्षणाकडे धावणारी माणसे, असे सांगितले आहे. त्या शेवटी लिहितात, "कवितेचा प्रारंभ हा पिंपात मेलेल्या उंदरांनी होतो. ... या दोन संकेतांमधूनही मर्ढेकर फार काही सांगून जातात."[७] विद्या प्रभुदेसाईंनी या संकेतातून मर्ढेकरांनी काय सांगितले आहे, हे मात्र 'थोडेही' सांगितले नाही.

भाऊ पाध्ये यांनीही या कवितेला दुसऱ्या महायुद्धाची पार्श्वभूमी असल्याचे सांगून नाझीवाद आणि एकतंत्री








साम्यवादाला विरोध करण्याची अवघ्या मानवजातीची इच्छा असूनही त्यांना तो प्रत्यक्षात करता येत नव्हता; हिटलरच्या काळात युद्धकैद्यांना मुर्दाड उंदीर बनवले होते, असे सांगून निपचित आणि निर्जीव यांच्या सीमारेषा स्पष्ट करीत कविता 'चमकदार' झाल्याचे सांगितले आहे. ... अस्तु.

पृथ्वी म्हणजे एक प्रदूषित, ओले दमट बुरसट पिंप आहे आणि त्यात जगणारी माणसे अल्पजीवी, अल्पसंतुष्ट, आत्मकेंद्री आणि क्षुद्र उंदरासारखी झाली आहेत. मानवी देहाला, देहवासनेला आणि तद्‌जन्य आनंदालाही क्षुद्रता आली आहे. उंदीर ज्याप्रमाणे बेसुमार पैदाशीने अफाट संख्येने वाढले आहेत – म्हणूनच ते नकोशे, क्षुद्रमोली आणि निरुपयोगी झाले आहेत –, त्याप्रमाणे माणूसही क्षुद्र, मूल्यहीन झाला आहे. माणसांच्यात अमाप लोकसंख्यावाढीने संख्यात्मक वाढ झाली असली, तरी त्यांची गुणात्मक वाढ, विकास मात्र खुंटलाच आहे. उंदीरही एक मेला तरी दुसरा ... तिसरा ... असे असंख्य उंदीर मरतात, पुन्हा नवीन जन्मताहेत ... पण माणूस हा बुद्धी, भावना, विचार धारण करणारा असूनही, संस्कृती निर्माण करणारा असूनही, त्याचे जीवन आता उंदराप्रमाणेच क्षुद्र झालेय. या किचकट, कुचकट, गर्दीच्या अटळ जीवघेण्या स्पर्धेत माणसांच्या माना मुरगळल्याविनाच पडल्या आहेत; कारण त्यांच्या पाठीच्या कण्यात ना मान तोलण्याचे बळ आहे ना कणा ताठ, मजबूत आहे; ना जीवनात कसली ऊर्जा आहे ना स्वत्व, ना सत्त्व, ना अस्मिता, ना संवेदनशीलता, ना उमेद ना मूल्यनिष्ठा ... असले निःसत्त्व जीवन जगताना या जगाच्या गर्दीत अस्तित्वासाठी जीवघेणा संघर्ष करावा लागतो आहे. उंदराला मांजरांचे, मांजरांच्या घाऱ्या डोळ्यांचे भय; म्हणजेच मृत्यूचे भय तद्वतच माणसाला अस्तित्वहीन होण्याचे भय आहेच. स्वत्वाची, स्वतःची ओळखच हरवून जाण्याचे भय आणि अटळ मृत्यूचेही भय आहे. या संघर्षाच्या फरफटीमध्येसुद्धा माणसाची, त्याच्या देहाची आदिम प्रेरणा, कामवासना जागी असतेच. ती इतकी नैसर्गिक, तीव्र आणि चिवट आहे, की ती उफाळून येतेच; मग त्या वासनेपोटी पुन्हा,

"ओठावरती ओळ मिळालें
माना पडल्या आसक्तीविण"

हा माणसांचा कामव्यवहारही उंदराप्रमाणेच क्षुद्र, क्षणभंगुर आणि निव्वळ देहवासनेतूनच येतो. त्यात भावना, आसक्ती नाहीच. केवळ अंध, उंदराप्रमाणे क्षुद्र देहव्यवहार.... हा शरीरव्यवहार इतका कृत्रिम, रूक्ष आणि यांत्रिक आहे की भावना, संवेदनक्षम आसक्तीच संपलीय. त्यात मन नाही, मेधा नाही. माणसे उंदरासारखीच जगतात आणि उंदीर जसे ओल्या पिंपात शेवटची उचकी देऊन मरतात, तशीच मरतात.

रात्र ही 'विश्रांतीची वेळ' असूनही माणसाला सुखनिद्रा नाहीच. मृत्यूचे भय आणि जिवंतपणीच ओळख हरवण्याचे, अस्तित्वहीन होण्याचे भय या भयाकुल वातावरणात, ताणतणावातही माणूस जगतोच; कारण मरण येत नाही. कारण, 'पराधीन आहे जगती पुत्र मानवाचा....' आणि माणूस मरतोच; कारण मृत्यू अटळ आहे, त्याच्या नियंत्रणाच्या बाहेर आहे. म्हणूनच मर्ढेकर म्हणतात,

"जगायची पण सक्ती आहे
मरायची पण सक्ती आहे"

या सगळ्या जीवनव्यवहारात अंध, जहरी उदासता भरली आहे याची जाणीव मर्ढेकरांना प्रकर्षाने झाली असल्याने अस्वस्थतेने ते लिहितात,

"उदासतेला जहरी डोळे
काचेचे पण;"

माणूस केवळ देहाने जिवंत म्हणून त्याला जीवन म्हणायचे अन्यथा मने मेलेलीच आहेत. त्यांचे जीवन, उदास जीवन असून नसल्यासारखेच... फक्त जीवनाचा आभास ... जसे काचेचे डोळे केवळ डोळे असल्याचा आभास निर्माण करतात; पण ते निर्जीव आणि निरुपयोगी असतात. मानवी जीवनातले अमृतमयी सुख, उच्च जीवन मूल्यनिष्ठांतून असणारी प्रसन्न उदात्तता हे सगळेच संपलेय. उरली आहे केवळ जहरी उदासता. या क्षुद्र जीवनशैलीला पर्याय नाही. उपाय नाही. या सगळ्या शुष्क जगण्याच्या यांत्रिकतेत 'जिवंत आहोत' किंवा 'आपण आहोत' ही भावना क्षणिक का होईना, पण आनंद देते; तो आनंदही 'मधाच्या पोळ्यासारखा' मोठा आणि गोड भासतो. पण या मूल्यहीन, ऱ्हासशील, क्षुद्र जीवनातला हा आनंद खरा आणि शाश्वत नाही; तर आभास आहे. आणि

म्हणूनच तो 'बेकलाइटी' आहे. मर्ढेकर लिहितात,

"मधाळ पोळे;
ओठांवरती जमलें तेंही
बेकलाइटी, बेकलाइटी!"

या क्षुद्र नकली आनंदाबद्दल उबग, उद्वेग येऊन मर्ढेकर 'बेकलाइटी, बेकलाइटी!' अशी द्विरुक्ती करतात. हा त्यांचा हताश अस्वस्थ उद्‌गार आहे, म्हणून त्यापुढे उद्‌गारचिन्ह आहे.

शेवटी असल्या यांत्रिक, रूक्ष जीवनातही न तुटणारी, न मिटणारी आदिम कामवासना, त्यातून मिळणारा क्षण-भंगुर कडू हलका आनंद क्षुद्र (उंदराप्रमाणे जीवनशैली बनलेल्या माणसांना) उंदरांना ब्रह्मानंद वाटतो आणि त्या आनंदाचा उत्सव साजरा करण्यासाठी त्याच पिंपात उंदीर न्हाले, आनंदाने न्हाले. मर्ढेकरांनी येथेही, 'पिंपात उंदीर न्हाले! न्हाले!' असे उपरोधाने हताशपणे उद्‌गार काढले आहेत. इथेही उद्‌गारचिन्ह आणि उद्‌गारचिन्हासह 'न्हाले'ची द्विरुक्ती आहेच.

आता या कवितेतील घटनाक्रम पहावा लागतो. कारण एकूण सतरा ओळींची ही कविता ... पहिल्या सहा ओळींत उंदीर मरतात. नंतरच्या सहा ओळींत त्या उंदरांची क्षुद्र जीवनशैली आणि शेवटच्या पाच ओळींत त्यांचा आनंदोत्सव असा क्रम दिसतो. ... एखादा चित्रपट जसा फ्लॅशबॅकने समोर ठेवला जातो, तशीच ही कविता फ्लॅशबॅक पद्धतीने मांडली आहे. म्हणूनच आधी मरणाची घटना आणि त्यानंतर जीवन आणि आनंदाचे स्वरूप या क्रमाने कविता समोर येते. ही एक खास मर्ढेकरी प्रयोग-शीलताच.

मर्ढेकरांच्या संवेदनशील कविमनाला मानवी जीवना-तील क्षुद्रता, जीवनाचे साचलेपण, कोंडलेपण, शेवाळले-पण अस्वस्थ करून गेले होते. तीच अस्वस्थता, विमनस्कता या कवितेतून व्यक्त झाली आहे. मानवी जीवनातील शुद्ध सात्त्विकता, चैतन्य, निरामय आनंद, चैतन्य, उत्कट तरलता नष्ट होऊन मानवी जीवनचक्राला आलेली भयग्रस्तता, बेगडीपणा त्यांनी उंदीर, पिंप, काच, घारे, जहरी डोळे या प्रतिमांतून व्यक्त केली आहे. परंतु हे मांडताना त्यांनी माणसाची कुठेही खिल्ली उडविली नाही; तर अपार कळवळ्यातून आलेली कणव आणि अस्वस्थता त्यातून व्यक्त होते. मर्ढेकरांच्या सर्वच कवितांतून मर्ढेकरांच्यातील माणूस आणि प्रतिभावंत कवी एकाच वेळी अभिव्यक्त होतो; हे त्यांचे आणि त्यांच्या कवितेचे थोरपण आहे.

मर्ढेकरांच्या कवितेत नवनिर्मिती, सौंदर्य, मांगल्य, वात्सल्य या मूल्यांचाही आविष्कार झाला आहे.

"स्वर्गातील सौंदर्याला। बहर कसा भूवर आला"

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ ८)

असे चकित करणारे सौंदर्यही मर्ढेकर शब्दबद्ध करतात; तर कधी "आई! येत म्हणून मस्तक तुझ्या अंकावरी ठेवण्या" असे म्हणून अपर्यायी मातृप्रेम व्यक्त करतात. तर 'एकेक पान गळावया' लागल्यानंतर इथली सुकोमल पाखरे आता कुठे जातील; या कल्पनेने आर्त व्याकूळ होऊन,

"... मज येतसे
न कळे उगाच रडावया"

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ २०)

असे सांगतात. तर कधी,

"चालणे ही अशीच। मर्त्यांश – अमर्त्यांश खेच
जो जिवंत सृष्टीचा पेंच। तोच पाया।।"

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ ३७)

असे म्हणून सजीव सृष्टीचा पेच उलगडतात. तर कधी

"आम्ही ज्ञानवंत भागलों। ना पश्चात्तापे पोळलो;
नाही कधी हळहळलो। परदुःखे"

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ ३८)

अशी कोरड्या ज्ञानवंताची कबुली देतात. तर कधी

"उकलाया सूत्र गाठी। अमुच्या बुद्धिसी वेठी
कासया धरिलेंस जगजेठी। सर्वसाक्षी"

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ ३९)

असा विधात्याला प्रश्नही विचारतात.

"पोरसवदा होतीस
कालपरवां पावेतों;
थांब उद्याचे माऊली;
तीर्थ पायाचे घेईतो"

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ ४५)

असे म्हणून मातृभक्तीचे, मातृगौरवाचे गीत गातात. तर कधी सध्याच्या आधुनिक यंत्रयुगातील घाम गाळणाऱ्या

अनुक्रमणिका






'नव्या मनुच्या गिरिधर पुतळ्या'चे सौंदर्य सांगतात; तर

"भंगु दे काठिन्य माझें
आम्ल जाऊं दे मनींचे
येऊ दे वाणींत माझ्या
सूर तुझ्या आवडीचे."

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ ७२)

अशी ईश्वराला प्रार्थनाही करतात. तर कधी,

"नशेत झुकला निशापती अन्
अस्मानाच्या कलल्या तारा;
अंधारावर विझून गेला
रात्रीचा या वीज-पिसारा."

(मर्ढेकरांची कविता पृष्ठ ७८)

असे सरत्या रात्रीचे आणि निशांताचे नेमके चित्र रेखाटतात; तर 'या गंगेमधिं गगन वितळलें' असे म्हणून जीवनातील मांगल्याचे वर्णन करतात. तर कधी,

"दवांत आलिस भल्या पहाटीं
शुक्राच्या तोऱ्यात एकदा;
जवळुन गेलीस पेरित अपुल्या
तरल पावलामधली शोभा."

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ ९६)

अशा शब्दांत प्रीतिभावनेने प्रियतमेचे सौंदर्यही वाखाणतात; आणि

"ओल्या वाळूंतून वर
येई रसाळ सुवास;
आणि मनातील बिया
देती हळूच आळस."

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ १०४)

अशा संपृक्त गतिमान प्रतिमांतून सृष्टीतील सृजनाची सुंदर सुवासिक प्रक्रियाही हळुवारपणे उकलतात. आणि

"आला आषाढ-श्रावण
आल्या पावसाच्या सरी
किती चातकचोचीनें
प्यावा वर्षाऋतु तरी."

(मर्ढेकरांची कविता, पृष्ठ ११२)

अशा सुगम शब्दांत वर्षाऋतूचे अप्रूप सांगणारे मर्ढेकर मराठी सारस्वताला लाभलेले अमोल देणे आहे. या २०११ साली बा. सी. मर्ढेकरांच्या 'पिपांत मेले ओल्या उंदिर ...' या बहुबहुचर्चित कवितेची पासष्टी आहे. त्या निमित्ताने मर्ढेकरांच्या अस्सल प्रतिभेला आणि अस्सल कवितेलाही हा मानाचा मुजरा.

**संदर्भ :**

१. नाडकर्णी एस. एस. : 'पिपांत मेले ओल्या उंदिर...' पद्मगंधा प्रकाशन, पुणे; जुलै २००९, प्रथमावृत्ती, पृ. ११६.
२. तत्रैव : पृष्ठ १३१.
३. तत्रैव : पृष्ठ १३८.
४. तत्रैव : पृष्ठ १७९.
५. तत्रैव : पृष्ठ १९७.
६. तत्रैव : पृष्ठ २१०
७. तत्रैव : पृष्ठ २१४-२१५.

**संदर्भसूची :**

१. धोंड म. वा. : तरीहि येतो वास फुलांना, राजहंस प्रकाशन, पुणे, एप्रिल १९९९, प्र. आ.
२. देशपांडे धों. वि. : मर्ढेकरांची कविता : एक अभ्यास, सा. प्र. केंद्र, नागपूर, १९९०, द्वि. आ.
३. राजाध्यक्ष विजया : मर्ढेकरांची कविता : स्वरूप आणि संदर्भ, १, २, मौज प्रकाशन, १९९१, प्र. आ.
४. कुलकर्णी द. भि. : द्विदल : मर्ढेकर काव्यविचार आणि काव्य : अन्योन्य संबंध, मराठी साहित्य परिषद, आंध्रप्रदेश.
५. पाटणकर वसंत : कवितेचा शोध, मौज प्रकाशन गृह, मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ, २०११ प्र.आ.

☆☆☆

# लज्जागौरीचा शोध की, डॉ. ढेरे यांचा कल्पनाविलास?

प्रा. विश्वनाथ शिंदे

डॉ. रा. चिं. ढेरे हे महाराष्ट्रातील संतसाहित्य, लोकसाहित्य, लोकसंस्कृतीचे मान्यवर अभ्यासक आहेत. इ. स. १९७३ पासून हे मातृदेवतेचा शोध घेत आहेत. नाना प्रकारांनी मातृदेवतेचे स्वरूप उलगडून सांगण्याचा प्रयत्न करीत आहेत. १९७३ साली त्यांनी 'शक्तिपीठांचा शोध' ही पुस्तिका प्रकाशित केली. पुढे त्यांचे हे संशोधन इ. स. १९७८ साली प्रकाशित झालेल्या त्यांच्याच 'लज्जागौरी' या ग्रंथात समाविष्ट झाले. लज्जागौरी या ग्रंथातून त्यांनी मातृदेवतेच्या स्वरूपावर आणि तिच्या उपासनापरंपरेवर नवा प्रकाश टाकला, त्यामुळे या ग्रंथातील त्यांचे संशोधन लक्षवेधक ठरले. इ. स. २००२ साली त्यांनी 'श्रीआनंदनायिकी' ही पुस्तिका प्रकाशित केली असून मातृदेवतेच्या संशोधनाचा जो महासंकल्प त्यांनी योजिला आहे, त्याचा हा संक्षिप्त आराखडा. याचा अर्थ डॉ. ढेरे यांचा मातृदेवतेचा शोध अखंडपणे आजही सुरू असल्याचे दिसते.

डॉ. ढेरे यांची 'श्रीआनंदनायिकी' ही पुस्तिका अलीकडे माझ्या वाचनात आली. त्यांचे एक भाषण, त्यांच्या पूर्वप्रकाशित पुस्तकातील दोन टिपणे, कर्नाटकातील अथणीजवळील रामतीर्थ या शिवस्थानाची शोधयात्रा केल्यानंतरचे त्या स्थळाबाबतचे त्यांचे संशोधन, आनंदनायिकीसंदर्भातील त्यांची एक प्रदीर्घ मुलाखत इत्यादी सामग्रींचा समावेश या पुस्तिकेत आहे. प्रस्तुत लेखात त्यांच्या 'रामतीर्थची आनंदनायिकी' या संशोधनपर लेखाचा परामर्श घ्यावयाचा आहे.

'अथणीजवळ रामतीर्थ या ठिकाणी शिवस्थान म्हणून प्रसिद्धी प्राप्त केलेले हे तीर्थस्थान कधीकाळी मैलार-खंडोबाचे प्रख्यात ठाणे असले पाहिजे,' असे विधान डॉ. ढेरे यांनी उपरोक्त लेखात केलेले असल्याने रामतीर्थ या ठिकाणाचे अवलोकन करण्यास मी प्रवृत्त झालो. सप्टेंबर २००९ मध्ये मी या परिसराला भेट दिली. डॉ. ढेरे यांनी येथील लज्जागौरीच्या प्रतीकात्मक शिल्पाबद्दल जी मांडणी केली आहे, ते शिल्प मी प्रत्यक्ष बघितले आणि त्यांच्या अनुमानाविषयी माझ्या मनात शंका निर्माण झाली. डॉ. ढेरे केवळ कल्पनाविलासाच्या आधारे एक व्याज लज्जागौरीचे मातृशिल्प वाचकांसमोर मांडतात, अशी माझ्या मनाची धारणा झाली. ती व्यक्त करण्याचा या लेखाचा उद्देश आहे. डॉ. ढेरे यांच्या लोकसाहित्य, लोकसंस्कृतीच्या संशोधनाबद्दल, त्यांच्या योगदानाबद्दल माझ्या मनात अतीव आदराची भावना आहे; पण डॉ. ढेरे यांच्यासारखे मान्यवर संशोधक वाचकांची दिशाभूल करीत असतील, तर निकोप संशोधनक्षेत्र डागाळण्याची शक्यता असते. अशी वाचकांची दिशाभूल कर्नाटकातील देवीहोसूर येथील संशोधनात डॉ. ढेरे यांनी कशी केली आहे, गणपतीची मूर्ती महालक्ष्मीची मूर्ती असल्याचे ढेरे कसे सांगतात, ते मी एका लेखात (शिंदे २०१० : १६ ते २२) साधार मांडले आहे. अशीच आणखी एक गफलत डॉ. ढेरे पुन्हा करीत आहेत, असे मला प्रामाणिकपणे वाटते.

**रामतीर्थ : प्राचीन तीर्थक्षेत्र :-**

रामतीर्थ हे बेळगाव जिल्ह्यातील अत्यंत प्राचीन तीर्थक्षेत्र आहे. अथणीच्या उत्तर दिशेला जत-उमराणीकडे जाणाऱ्या रस्त्यावर अथणीपासून सुमारे पस्तीस कि.मी. अंतरावर हे तीर्थक्षेत्र आहे. मुख्य रस्त्यापासून तीन कि. मी. आत गेल्यावर रामतीर्थ या ठिकाणी आपण पोचतो. कामदा-पापनासिनी या नद्यांच्या संगमावर वसलेले हे छोटेसे गाव. गाव छोटे असले, तरी येथील रामेश्वर-शिवमंदिर मात्र अत्यंत भव्य आहे. इथला मंदिरसमूह पूर्व, पश्चिम आणि दक्षिण या तिन्ही बाजूंच्या प्राकारभिंतीनी बंदिस्त आहे आणि उत्तरेकडील बाजू आनंदपर्वताचा खडक खोदून तयार केली आहे. पूर्वाभिमुख असणारे मोठे प्रवेशद्वार ओलांडून आपण जेव्हा मंदिराच्या आवारात प्रवेश करतो, तेव्हा आपल्या दृष्टिपथात येते ते रामेश्वराचे मंदिर. रामेश्वर हा या क्षेत्राचा अधिपती आहे. स्थापत्य

आणि मूर्तिशिल्प या दोन्ही दृष्टींनी सुंदर असलेले हे मंदिर नवव्या–दहाव्या शतकापूर्वीचे आहे. कल्याणीचे चालुक्य आणि कलचुरीच्या काळात रामेश्वराचे हे मंदिर उभे राहिले असेल. येथे आठ-दहा कोरीव लेख आहेत. काही लेख अद्याप अप्रकाशित आहेत. त्यांपैकी दोन कन्नड कोरीव लेख संशोधकांनी वाचून प्रकाशित केले आहेत. त्या लेखांमध्ये या रामतीर्थस्थानाचे वैभव वाढविणाऱ्या राज्यकर्त्यांचा आणि शैवसंप्रदायाच्या आचार्यांचा निर्देश आला आहे.

(रामतीर्थ शिवमंदिरातील दिपमाळ आणि प्रवेशद्वार)

मंदिराच्या आवारात पाऊल ठेवताच आपले लक्ष वेधून घेते ती प्रवेशद्वाराजवळील उत्तुंग दीपमाळ. ह्या दीपमाळेवर अनेक मयूरशिल्पे कोरलेली आहेत. दीप-माळेच्या शेजारीच मयूरवाहन सुब्रह्मण्यमची सर्वांगसुंदर मूर्ती आहे. मूर्ती सुब्रह्मण्यमची असली, तरी त्याच्या द्वारपट्टीवर 'भैरवनाथ' असे नाव लिहून ठेवले आहे. उत्तरेकडील ओवऱ्यांमध्ये अनेक नागशिल्पे आहेत. चंडिकेश्वर, मारुती, गजानन, पांडुरंग-रुक्मिणी, लक्ष्मी-नरसिंह, आमरेश्वर, ब्रह्मदेव अशा विविध देवदेवतांची स्थाने आहेत. श्री विक्रमादित्य स्वामींचे समाधी स्थानही आवारात आहे. पापनासिनी, माणिकर्णिका, रामेश्वर अशी तीर्थकुंडेही आवारात आहेत.

रामेश्वराचे दर्शन घेऊन मंदिराच्या पश्चिमेकडे गेल्या-नंतर आनंदपर्वताचा प्रस्तर फोडून एक कृत्रिम प्राकारद्वार निर्माण केलेले दिसते. त्या द्वारावर 'आनंदनायिकी' अशी अक्षरे कोरलेली दिसतात. आनंदपर्वत कोरून एक गूढ गुहा तयार करून त्या गुहेतच आनंदनायिकीच्या मूर्तीची प्रतिष्ठापना केली आहे. हातात खड्ग, खेटक, गदा आणि पानपात्र धारण केलेली ही मूर्ती १९८४ मध्ये भक्तांनी स्थापित केली असून जुनी भग्नमूर्ती विसर्जित केली आहे. मूर्तीच्या मागील भागात तीनचार मीटर लांब गुहा पोखरून काढली आहे.

सुमारे अकराव्या-बाराव्या शतकात रचलेल्या 'श्रीस्वयंभूरामेश्वरमाहात्म्य' या संस्कृत स्थलपुराणाच्या आधारे रामतीर्थाच्या सेवासमितीने एक पुस्तिका प्रकाशित केली असून त्यात कहोलऋषी आणि दाशरथी राम यांच्या कथा सांगितल्या आहेत. (के. जी. उपाध्ये : २००५ : १-२) रामतीर्थजवळ असणाऱ्या कोहळ्ळी या गावात कोहलऋषीचे मंदिर असून तेथे या ऋषीचा आश्रम होता, असे सांगितले आहे. या पुस्तिकेत रामतीर्थ या स्थानी रामेश्वराचे आगमन कसे झाले, याची कथाही भक्तिभावनेने विशद केली आहे.

**रामतीर्थची प्राचीनता आणि ढेरे यांचे मौलिक संशोधन :**

डॉ. रा. चिं. ढेरे यांनी 'श्रीआनंदनायिकी' या पुस्तिकेत रामतीर्थ या तीर्थक्षेत्राचा प्राचीन इतिहास विस्ताराने सांगितला आहे. तो इतिहास संक्षेपाने ध्यानात घेऊ. रामतीर्थ येथील रामेश्वराचे मंदिर नऊ-दहा शतकांपूर्वीचे असून मंदिराच्या आवारात जे आठ-दहा शिलालेख आहेत, त्यांच्या आधारे रामतीर्थ स्थानाची प्राचीनता स्पष्ट होते. यांपैकी दोन कन्नड शिलालेख आर. एस. पंचमुखी यांनी 'कर्नाटक इनस्क्रिप्शन'च्या दुसऱ्या भागात प्रकाशित केले आहेत. त्यांपैकी एक लेख कल्याणीचा चालुक्य नृपती त्रिभुवनमल्लदेव (सहावा विक्रमादित्य) यांच्या काळातला असून रामतीर्थातील रामेश्वराची पूजाअर्चा, भरणपोषण, रामेश्वराच्या मंदिराच्या जीर्णोद्धारादी कामासाठी श्रीकरणा-धिपती महाप्रधान चौवुणय्या आणि महामंडलेश्वर पेर्मा-डियरस यांनी नागहळ्ळी हे गाव दान दिल्याची नोंद आहे. या दानाचा स्वीकार नेमेश्वरदेवाचा भक्त आणि गोटकनुरू आचार्यपरंपरेतील आचार्य शिवशक्ती पंडित यांनी केला, हे दान बुधवार दि. १० फेब्रुवारी १११५ या

दिवशी फाल्गुनी पौर्णिमेला चंद्रग्रहणप्रसंगी दिले, अशा नोंदी शिलालेखात आहेत. शिवशक्ती पंडित हा लाकुलीश पाशुपत संप्रदायाच्या कालामुख शाखेतील शैव आचार्य होता.

पंचमुखींनी प्रकाशित केलेला दुसरा शिलालेख शके १०८९ (सोमवार, दि. २ मे ११६६) मधला असून त्यामध्ये रामेश्वर मंदिराचे प्रधान आचार्य चंद्राभरण पंडित यांना बिज्जलदेव यांनी सिंदवून गाव दान दिल्याची नोंद आहे. चंद्राभरण पंडित हेदेखील कालामुख परंपरेतील आचार्य आहेत.

उपरोक्त दोन्ही शिलालेखांच्या व अन्य सामग्रीच्या आधाराने डॉ. रा. चिं. ढेरे यांनी कल्याणीच्या चालुक्याच्या काळात कर्नाटकात कालामुख संप्रदाय कसा प्रभावी होता, शिवोपासनेचे वैभव प्रचंड प्रमाणात कसे वाढले होते, याचे विवरण केले आहे. तसेच या "शैवचार्यांनी दक्षिणेतील लोकधर्मीय उपासनाकेंद्राच्या लोकप्रियतेचा लाभ घेऊन त्यांचे समृद्ध शिवस्थानात कसे यशस्वी परिवर्तन केले, तसेच रामतीर्थ या क्षेत्रस्थानी शैवाचार्यांनी देवतांच्या उपासनेची केंद्रे शिवोपासनेच्या एका समृद्ध केंद्रात परिवर्तित कशी केली, याचे साधार विवेचन केले आहे." (ढेरे : २००२ : ५७-५८) आज रामेश्वराचे नाव धारण करून प्रतिष्ठित झालेला शिव मुळात मैलार-खंडोबाच्या शिव-भैरवरूपात वावरत असला पाहिजे आणि आनंदनायिकी ही मातृदेवता मूळ लज्जागौरीच्या रूपातील लोकधर्मीय मातृदेवता असली पाहिजे, अशा निष्कर्षाप्रत डॉ. ढेरे आले आहेत. (ढेरे : २००२ : ५३). लज्जागौरीच्या नावात, रूपात आणि चरित्रात असे जाणीवपूर्वक परिवर्तन घडवून तिला वैष्णवरूप देण्याचा आणि शैवपरिवारात एका गौण देवतेचे स्थान देण्याचा प्रयत्न होऊनही मौखिक परंपरेत मात्र तिच्या मूळ रूपातली आणि मूळ चरित्राची स्मृती टिकून राहिलेली आढळते; ही डॉ. ढेरे यांची मांडणी सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीने मौलिक स्वरूपाची आहे. रामतीर्थ या धार्मिक क्षेत्राचे डॉ. ढेरे यांनी केलेले संशोधन, आनंदनायिकी या मातृदेवतेचे त्यांनी केलेले विश्लेषण नवी दृष्टी देणारे आहे. परंतु या पुस्तिकेत 'वडाखालची लक्ष्मी'चे त्यांनी केलेले विवेचन मात्र न पटणारे आहे. ज्या प्रतीकशिल्पाच्या आधाराने हे शिल्प लज्जागौरीचे आहे असे ते खात्रीपूर्वक सांगतात, ते योग्य नाही असे मला वाटते. वडाखालच्या लक्ष्मीसंदर्भात डॉ. ढेरे यांनी केलेले विश्लेषण हा त्यांचा केवळ कल्पनाविलास आहे, असे मला वाटते. तो कल्पनाविलास कसा आहे हे पाहू –

**प्रतीकशिल्पाचे स्वरूप :**



(रामतीर्थ (अथणी) कर्नाटक येथील वडाखालच्या लक्ष्मीचे उंबरणशिल्प शिल्पास डॉ. रा.चि. ढेरे लज्जागौरी शिल्प असे संबोधतात.) हे शिल्प अंथरलेले नाही, भिंतीला टेकवून उभे ठेवले आहे.

डॉ. रा. चिं. ढेरे यांनी वडाखालच्या लक्ष्मीच्या प्रतीकशिल्पाचे वर्णन केले आहे. ते त्यांच्याच शब्दात पाहू – "सुमारे अडीच फूट उंच आणि दोन फूट रुंद अशा सपाट शिळेवर उठावाच्या जाड रेषांच्याद्वारे हे प्रतीकशिल्प निर्माण केलेले आहे. देवीचे नाभिस्थान अष्टदल कमलाच्या स्वरूपात रेखांकित केलेले असून तळाशी सर्जनेंद्रियाचे सूचन घडविणारा तीन पाकळ्यांचा अर्धकमळाचा त्रिकोण आहे. माथ्यावर शिरोविहीनता स्पष्ट करणारी खंडित कंठाची आडवी रेषा आणि रेषांच्या दोन्ही टोकांपासून दोन्हीकडे तिपेडी जाड रेषांच्याद्वारा, बाजूला घेतलेल्या दोन्ही पायांच्या पावलांपर्यंतचा देहप्रांत वेलबुट्टीच्या सुंदर महिरपीप्रमाणे रेखाटला आहे. त्या आदिमातेच्या सर्जक इंद्रियांना कमलरूपात केंद्रस्थानी चित्रित करून त्या कमळाभोवती तिच्या सुघड देहाची महिरप सुकोमल वेलींच्या वर्तुळवक्रतेने मांडली आहे. या प्रतीकशिल्पात दोन्ही स्कंधांवर वळणदारपणे चारचार कमळकळ्या लांबलचक देठांचा जुडगा बांधलेल्या स्वरूपात रेखांकित केलेल्या आहेत आणि बांधलेल्या

भागाच्या खाली ते देठ एकत्रितपणे महिरपीशी संवादी वळण घेऊन खालपर्यंत आलेले आहेत. आणखी विशेष म्हणजे या चारचार कमळकळ्यांपैकी एकेक कळी शंखाच्या आकारात कोरलेली आहे किंवा आपण असे म्हणू या की, देवीच्या स्कंधाकडील भागात ज्या कमळ-कळ्या दाखविलेल्या आहेत, त्यामध्ये दोन्हीकडे एकेक शंख देठासह असलेल्या कमळकळीसारखा रेखांकित केलेला आहे. मध्यभागीचे नाभिकमळ, तळाकडील सर्जनें-द्रियाचे अर्धकमळ आणि स्कंधाकडील कमळकळ्या यांतून ही देवी कमलरूपिणी कमला असल्याचे स्पष्टच आहे." (ढेरे : २००२ : ५१-५२) डॉ. ढेरे यांचे निरीक्षण अत्यंत सूक्ष्म असते, त्यांची काव्यात्मक भाषा वाचकांच्या मनावर मोहिनी टाकणारी, जादूमय स्वरूपाची असते. वाचकांना सहजपणे मोहजालात गुंतवून टाकण्याचे सामर्थ्य त्यांच्या लेखणीमध्ये असल्याने ते वाचकांना आपल्या बरोबर नेतात, गुंतवतात: वाचकांना वेगळा विचार करण्याची सवडच त्यांची भाषा देत नाही. त्यामुळे डॉ. ढेरे जे सांगतात, ते ज्या पद्धतीने सांगतात, ते पाहून वाचक चकित होतो, त्यांच्या कल्पनासामर्थ्यावर बेहद खूश होतो आणि ढेरे सांगतात ते खरेच असले पाहिजे, अशी स्वत:च्या मनाची समजूत करून घेतात.

मी स्वत:देखील डॉ. ढेरे यांच्या कल्पनाविलासात स्वाभाविकपणे रममाण झालो, कारण रामतीर्थ गावापासून एक फर्लांगभर अंतरावर ओढा ओलांडून पलीकडे गेल्यावर एका वडाच्या झाडाखाली लहानशा मंदिरात या शिल्पाची प्रतिष्ठापना केली होती. चौथऱ्याला लागूनच एक नाग-युगलाचे शिल्प होते, प्रतीकशिल्पावर जागोजागी हळद-कुंकू लावून पूजा केली होती. आपली कूस उजवावी, आणि जन्मलेली बाळे सुखी रहावीत म्हणून स्त्रिया या देवीची पूजा करतात. गावातील लोक या प्रतीकशिल्पाला 'वडाखालची लक्ष्मी' असे संबोधतात. हे सर्व मी प्रत्यक्ष बघितले. गावातील मोकाशीकुळातील कोणीतरी पूर्वज-पुरुषाने या देवीचा जीर्णोद्धार केला आणि लक्ष्मी देवालयाची निर्मिती केली. (के. जी. उपाध्ये : २००५ - १०) ओढ्याकाठी अलक्षित ठिकाणी असणाऱ्या लक्ष्मी-देवीला डॉ. ढेरे प्रकाशात आणत आहेत, या गोष्टीचा मला आनंद वाटला. पण माझा हा आनंद फार काळ टिकू शकला नाही. कारण ज्या प्रतीकशिल्पाला डॉ. ढेरे लज्जागौरीचे, लक्ष्मीचे प्रतीकशिल्प म्हणतात, जगत्जननी, आदिमाता म्हणतात, ते प्रतीकशिल्प कोणत्याही स्वरूपातील मातृदेवतेचे नसून शिवमंदिराच्या उंबऱ्याबाहेर असणारे ते उंबरा सुशोभित करणारे शिल्प आहे, त्याला 'उंबरण' अशी संज्ञा वापरली जाते. हे जेव्हा मला कळाले, तेव्हा मी डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या प्रतिभाविलासा-पुढे नतमस्तक झालो.

**खडकलाटचे शिवमंदिर आणि उंबरण शिल्प :**



(खडकलाट येथील भंगलेले उंबरण शिल्प)



(खडकलाट येथील शिवमंदिरातील उंबरण शिल्प)

रामतीर्थ, ककमरी पाहून आम्ही येडूर, मायाक्का चिंचणी अशी शोधयात्रा करीत खडकलाट येथे पोचलो. खडकलाट हे बेळगाव जिल्ह्यातील प्राचीन परंपरा असणारे गाव. निपाणीच्या दक्षिण बाजूला सुमारे १५ कि. मी. कच्च्या रस्त्याने गेल्यावर या गावी पोचता येते. खडकलाट हे प्रख्यात अभिनेत्री सुलोचना लाटकर यांचे गाव. या गावात एकूण १९ विविध देवदेवतांची मंदिरे आहेत. त्यांपैकी महादेवाचे एक अतिप्राचीन मंदिर गावात आहे. याशिवाय बीरदेव, वासीकांत, हालसिद्धनाथ श्रीमहालक्ष्मी या देवतांची मंदिरे गावात आहेत. लक्ष्मी हे ग्रामदैवत

असले तरी शंकरलिंगेश्वर-महादेव ही मंदिरे प्राचीन आहेत. या गावातील एक जाणकार श्री बाबुराव बसप्पा कुंभार, वय वर्षे ७१ यांच्या म्हणण्यानुसार महादेवाचे मंदिर दहाव्या शतकाच्याही आधीचे आहे. बाकीच्या मंदिरांचे दर्शन घेऊन आम्ही महादेवाच्या मंदिरात पोचलो.

मंदिराचा परिसर मोठा नसला तरी मंदिराचे बांधकाम आणि त्याचे शिल्पसौंदर्य नजरेत भरणारे आहे. मंदिराची मोठ्या प्रमाणात पडझड झाली आहे. अनेक वेळा मंदिराचा जीर्णोद्धार गावकऱ्यांनी केला आहे. मंदिर गावच्या मध्य-भागी असून प्रवेशद्वार रस्त्यालगतच आहे. प्रवेशद्वाराची इतकी पडझड झाली आहे की, येथे प्रवेशद्वार होते हे सांगितल्याशिवाय लक्षात येत नाही. त्या प्रवेशद्वारातून आत प्रवेश करताच अनेक ठिकाणी तडे गेलेले गजान्त-लक्ष्मीचे मोठ्या आकाराचे एक शिलाशिल्प नजरेस पडले. गजान्तलक्ष्मीचे शिल्प ओलांडून पुढे गेल्यावर महादेव मंदिराच्या मुखमंडपाचा दरवाजा लागतो. त्या दरवाजाच्या दगडी चौकटीसमोर डॉ. रा. चिं. ढेरे यांनी वर्णन केलेल्या रामतीर्थ येथील प्रतीकशिल्पाची प्रतिकृती वाटावे असे शिल्प अंथरलेल्या अवस्थेत दिसले. त्या शिल्पावर भक्त बूट-चपला उतरून चौकटीतून मंदिरात प्रवेश करतात. या प्रतीकशिल्पाला तडे गेले होते, त्याचा काही भाग तुटलेला होता. मुखमंडपाच्या चौकटीतून आम्ही मंदिरात शिरलो, आणि गाभाऱ्यात जात असताना गर्भगृहाच्या दगडी चौकटीसमोर उंबऱ्यालगत अंथरलेल्या स्थितीत त्याच स्वरूपाचे दुसरे शिल्प दिसले. हे प्रतीकशिल्प मात्र अत्यंत सुबक, आकर्षक, सुस्पष्ट आहे. रामतीर्थ येथील प्रतीकशिल्पाचे जे वर्णन डॉ. ढेरे यांनी केले आहे, त्यासारखेच हे शिल्प होते. आमच्या सोबत श्री. बाबुराव कुंभार होते, त्यांना मी या प्रतीकशिल्पाबद्दल विचारले. ते म्हणाले, "हे शिल्प कशाचे आहे हे माहिती नाही, पण चौकटीसमोरचा भाग सुशोभित करण्यासाठी याचा वापर केला जातो. या शिल्पाला आम्ही 'उंबरण' असे म्हणतो. उंबऱ्याजवळ असल्याने हे 'उंबरण'." हे उंबरण बघितल्यानंतर माझ्या मनात प्रश्न निर्माण झाला, की डॉ. ढेरे या शिल्पाला मातृदेवतेचे प्रतीक मानतात. मग हे असे पायदळी का अंथरले असेल? श्री. बाबुराव कुंभार सांगतात त्याप्रमाणे उंबरा सुशोभित करण्यासाठी या शिल्पाचा उपयोग करण्याची प्रथा असेल, तर डॉ. ढेरे यांची निश्चितच काही गफलत झालेली आहे.

पुढे आणखी काही दिवसांनी मी लातूर-नांदेड रस्त्यावर असणाऱ्या माळेगाव येथील खंडोबाच्या मंदिरात गेलो.



(माळेगाव, जि. नांदेड येथील खंडोबा मंदिरातील उंबऱ्यासमोरील उंबरणशिल्प)

माळेगावच्या खंडोबाच्या गाभाऱ्याच्या चौकटीच्या उंबऱ्यासमोर याच प्रकारचे शिल्प अंथरलेल्या स्थितीत दिसले. या शिल्पावर भक्तांनी चांदीचे राणीछाप रुपये ठोकून बसविण्याचा प्रयत्न केला होता, त्याचे खड्डे या शिल्पाच्या सर्वांगावर आहेत. अकलूजजवळच्या नीरा नरसिंगपूर या प्राचीन तीर्थस्थळाची मी जेव्हा शोधयात्रा केली, तेव्हा ढेरे सांगतात त्याच्याशी साधर्म्य सांगणारे शिल्प नृसिंहाच्या गाभाऱ्याच्या उंबरठ्यासमोर अंथरलेले मी बघितले.



(नीरानरसिंगपूर (अकलूज) येथील उंबरणशिल्प)

या शिल्पात कलाकाराने आपल्या कल्पनेने काही बदल केले आहेत. कुरुंदवाडजवळ असणाऱ्या खिद्रापुरच्या कोपेश्वर मंदिरातही याच प्रकारचे शिल्प आढळते. पुढे मला अशी माहिती कळाली की, खुद्द कोल्हापुरात याच

प्रकारचे शिल्प ओंकारेश्वर मंदिरात आहे.



(कोल्हापूर येथील ओंकारेश्वर मंदिरातील शिवलिंग आणि गाभाऱ्यासमोर उंबऱ्याजवळ दिसणारे उंबरण शिल्प)

कोल्हापूरच्या अंबाबाईच्या मंदिराइतकेच प्राचीन असणारे, अनेक प्रकारची कलाकुसर करून दगडी शिल्प-कृतीने नटविलेले खिद्रापूरच्या कोपेश्वर मंदिराची आठवण देणारे हे ओंकारेश्वराचे मंदिर अंबाबाई (महालक्ष्मी) मंदिराच्या सान्निध्यात दक्षिण दिशेला आहे. या मंदिराच्या गर्भगृहाच्या उंबरठ्याजवळ असे उंबरण शिल्प आहे. हे रामतीर्थच्या प्रतीकशिल्पाची प्रतिकृती नाही, पण त्यातील अनेक संकल्पना या शिल्पाच्या कोरीव कामात शिल्पकाराने जशाच्या तशा वापरलेल्या आहेत. कोल्हापूरपासून आठ-दहा कि. मी. अंतरावर कणेरीमठ आहे. कर्नाटकातील काडसिद्धेश्वर स्वामींचे हे पीठस्थान असून या ठिकाणी अत्यंत प्राचीन दगडी शिल्पांनी सजवलेले शिवमंदिर आहे. या मंदिराच्या उत्तर दरवाजाच्या बाहेरील उंबऱ्याजवळ याच स्वरूपाचे उंबरण शिल्प अस्तित्वात आहे. ही सर्व उदाहरणे लक्षात घेता खडकलाटचे श्री. बाबुराव कुंभार म्हणतात तेच अगदी खरे आहे, याची खात्रीच होते. आणि डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या म्हणण्यात कोणत्याही प्रकारचे तथ्य नाही, ते स्वतःच्या गृहीतकास अनुकूल ठरणाऱ्या पुराव्यांची केवळ कल्पनेने उभारणी करतात, असे दिसते.

### वडाखालची लक्ष्मी शिल्परूपात कशी?

रामतीर्थ येथील रामेश्वराच्या मंदिराचा जीर्णोद्धार करताना मंदिरातील हे उंबरणशिल्प कोणीतरी काढून बाजूला ठेवले, ते शिल्प काही वर्षे दुर्लक्षित स्वरूपात कुठेतरी पडून राहिले, पुढे कधीतरी मोकाशीवंशातील पूर्वजाने ते उंबरणशिल्प गावाच्या बाहेर ओढ्याकाठी वडाच्या झाडाखाली स्थापित केले. (के. जे. उपाध्याय : २००५ : १०) आणि त्या शिल्पाला लक्ष्मीचे रूप आले. हा माझा अंदाज नाही; तर प्रत्यक्ष ढेरे याच पुस्तिकेत लिहितात, "रामतीर्थातही शैवाचार्यांनी नवा पावित्र्यव्यूह मांडताना तिथल्या मूळ मूर्तीच्या जागी हे नवे शिल्प घडविलेले दिसते किंवा अन्य संदर्भात कोरलेल्या तयार शिल्पाची येथे प्रतिष्ठापना केलेली दिसते." (ढेरे : २००२: ५१) डॉ. ढेरे ज्या शिल्पास लज्जागौरीचे शिल्प संबोधतात, त्यालाच एके ठिकाणी खुद्द त्यांनीच 'तोरणशिल्प' असे म्हटले आहे. (ढेरे : २००२ : ९०) या सर्व गोष्टींच्या पुराव्यांचा विचार करता ते शिलाशिल्प तोरणशिल्प नाही तर 'उंबरणशिल्प' आहे याविषयी आपली खात्री होते. खंडोबाच्या किंवा शिवाच्या मंदिरात 'उंबरणशिल्प' असते. मी दिलेल्या उदाहरणांवरून आणि सोबत दिलेल्या फोटोवरून ते स्पष्टच दिसते. ज्या शिल्पास ढेरे लज्जागौरीचे शिल्प समजतात, ते अन्य संदर्भात कोरलेले शिल्प असावे ही डॉ. ढेरे यांच्या मनातील शंका खरीच होती; पण त्यांच्या मनात उद्‌भवलेली ही शंका त्याच्या मूळ गृहीतकाला छेद देणारी आहे हे त्यांच्या लक्षात आल्याने त्या शंकेकडे त्यांनी दुर्लक्ष केले. खरेतर हे शिल्प अन्य संदर्भातच कोरलेले होते, रामेश्वराच्या गर्भगृहाच्या चौकटीजवळ उंबऱ्याला लागून अंथरलेले ते उंबरणशिल्पच होते. मंदिराचा जीर्णोद्धार करताना भक्तांना या शिल्पाचा संदर्भ न कळल्याने किंवा ते अनाठायी वाटल्याने शैवाचार्यांनी हे शिल्प गर्भगृहाजवळून हटवले. अत्यंत विलोभनीय असणारे हे शिल्प बाजूला, दुर्लक्षित ठिकाणी टाकून दिलेले असले, तरी त्याचा आकर्षकपणा नजरेआड होण्यासारखा नव्हता, त्यामुळे ते विलोभनीय आकर्षक 'उंबरणशिल्प' मोकाशी-वंशातील कोण्या पूर्वजाने उचलून नेले आणि वडाखालची लक्ष्मी म्हणून स्थापित केले. मोकाशीकुटुंबातील पूर्वज-पुरुषाने ते जाणता-अजाणता किंवा उत्पन्नाचे एक साधन या व्यावहारिक हेतूनेही केले असण्याची शक्यता आहे. पण ढेऱ्यांना मात्र तसे वाटत नाही. कोणताही आधार न देता ते लिहितात, "अदर्शनीय वाटणारे तिचे मूळचे शिरोविहीन असे मातृशिल्प नाहीसे केले आणि आज त्या ठिकाणी तिच्या मूळ रूपाशी सादृश्य असणारे

तोरणशिल्प देवी म्हणून पुजले जात आहे." (ढेरे : २००२ : ९०) स्थापित केलेले हे शिल्प लक्ष्मीदेवीच्या रूपात प्रतिष्ठित झाल्याने लोक लक्ष्मीदेवी म्हणून तिची पूजाअर्चा करू लागले. रामेश्वराच्या गर्भगृहाजवळील हे उंबरणशिल्प सौभाग्याचे प्रतीक बनले, सौभाग्यदात्री लक्ष्मी म्हणून ते लोकप्रिय झाले. संशोधकांनी भाविकांची श्रद्धा ध्यानात घ्यायला हवी हे मान्य; मात्र स्वत: भाविक होऊन श्रद्धेत बुडून न जाता, तटस्थपणे श्रद्धेचा वेध घेऊन वस्तुस्थिती मांडणे आवश्यक असते. डॉ. ढेरे तटस्थपणे विश्लेषण न करता कल्पनेचे विश्व निर्माण करतात, उंबरणशिल्पातून लज्जागौरीचे कल्पनाविश्व ढेरे उभे करतात.

**रामेश्वर मंदिराच्या जीर्णोद्धाराचे प्रयत्न :**

या लेखात पूर्वोल्लेखित शिलालेखात रामेश्वराच्या मंदिराचा जीर्णोद्धार करण्यासाठी दान दिल्याचा निर्देश आहे. म्हणजे ते दान दिल्यानंतर मंदिराचा पहिल्यांदा जीर्णोद्धार झाला असेल. शैवाचार्यांनी लोकधर्मी देवतांची उपासनाकेंद्रे शैवोपसानेच्या समृद्ध केंद्रात परिवर्तित केल्याचा निर्देश या आधीच्या विवेचनात आला आहे. याचा अर्थ रामतीर्थ या तीर्थस्थळाचा जीर्णोद्धार, परिवर्तन, आदलाबदलाची प्रक्रिया वारंवार घडली यात शंका नाही. ज्या त्रिविक्रमस्वामींचे समाधिमंदिर रामतीर्थ परिसरात आहे, ते स्वामी वाई (जि. सातारा) येथून रामतीर्थ येथे आले. त्याचे वास्तव्य दीर्घकाळ या क्षेत्री होते. त्यांच्या निर्वाणानंतर त्यांची समाधी मंदिरपरिसरात बांधण्यात आली. या त्रिविक्रम स्वामींचे परमभक्त पेशव्यांचे सरदार रास्ते रामतीर्थला आले होते आणि त्यांनीच रामेश्वर-मंदिराच्या दर्शनी भागातील मोठ्या मुखमंडपाची उभारणी केली होती. (के. जी. उपाध्याय : २००५ : १३) म्हणजे या मुखमंडपाची उभारणी करताना मूळ मंदिरात अनेक बदल केले असण्याची शक्यता नाकारता येत नाही. वारंवार केलेल्या जीर्णोद्धाराच्या प्रक्रियेत कधीतरी रामेश्वर मंदिराच्या गर्भालयाच्या उंबऱ्याजवळील उंबरणशिल्प मूळ मंदिरातून हलवले गेले. आणि हलवलेले हे शिल्प मोकाशींच्या कुणा पूर्वजाने वडाखाली स्थापित केले. याच उंबरणशिल्पाला डॉ. रा. चिं. ढेरे लज्जागौरीचे प्रतीकशिल्प मानतात, हे आता स्पष्टपणे म्हणता येईल.

इतिहाससंशोधक अ. रा. कुलकर्णी यांनी डॉ. रा. चिं. ढेरे यांना कधीतरी, 'अथणीजवळील रामतीर्थ नावाच्या क्षेत्रात लज्जागौरीचे एक वेगळ्या प्रकारचे शिल्प आहे', असे सांगितले होते आणि त्या शिल्पाच्या शोधात डॉ. ढेरे इ. स. १९८८ च्या उत्तरार्धात रामतीर्थला आले. त्यांनी रामतीर्थ या ठिकाणी श्री. अ. रा. कुलकर्णी यांनी सांगितलेल्या लज्जागौरीच्या शिल्पाचा शोध घेतला. पण काही केल्या त्यांना लज्जागौरीचे शिल्प सापडत नव्हते. अखेरीला त्यांना वडाखालची लक्ष्मी ज्या स्वरूपात पूजली जात होती, ते शिल्प (उंबरणशिल्प) नजरेस पडले. ते मातृदेवतेच्या रूपात पुजले जात असल्याने त्या शिल्पाला बघताच डॉ. ढेरे यांची शोधप्रतिभा जागी झाली, त्यांच्या प्रतिभेला उंबरणशिल्पातून लज्जागौरीचे रूप दिसू लागले. त्या दगडी शिळेवर देवीचे नाभिस्थान, शिल्पाच्या तळाशी देवीचे सर्जनेंद्रिय दिसू लागले, शिल्पाच्या वरील भागात देवीचे शीर खंडित केलेली तुटलेली मान दिसू लागली, दोन्ही बाजूला पाय आणि पावले जाणवू लागली. आणि देवीचा सुघड देह त्यांच्या नजरेसमोर उभा राहिला. रामतीर्थ येथे लज्जागौरीचे शिल्प आहे या विश्वासाने ते येथे आले होते, तिचा शोध घेत होते; पण त्यांच्या 'लज्जागौरी' या पुस्तकात लज्जागौरीची जी छायाचित्रे छापली आहेत, त्यामध्ये संभोगोत्सुक अवस्थेतील स्त्री, नाभीपर्यंतचा देह असलेली, केवळ स्कंधापर्यंतचा देह असलेली, शिरोभागी शिराऐवजी कमळ असलेली, सर्जनेंद्रियाला उठाव देऊन प्रदर्शित केलेली स्त्री, अशी शिल्पे आहेत. (ढेरे : १९७८: १५-१६) डॉ. ढेरे यांना रामतीर्थात यांपैकी कोणतेही रूप दिसले नाही. पण उंबरणशिल्पाला बघताच त्यांच्या मनःकोशात साठवलेले लज्जागौरीचे रूप कल्पकतेने त्यांनी उभे केले. जे शोधण्यासाठी आपण येथे आलो ते आपल्या हाती लागले, अशी त्यांची समजूत झाली आणि त्यांचा आनंद ओसंडून वाहू लागला. डॉ. तारा भवाळकर लिहितात, "स्त्रीदेवतांच्या उपासनाविषयातील दशकभराच्या अभ्यासचिंतनातून अधिक प्रगल्भ आणि परिणत अवस्थे-पर्यंतचा प्रवास आणि त्याअखेरचे निष्कर्ष 'श्रीआनंदनायिकी' मध्ये व्यक्त झाले आहेत." (भवाळकर: २००५ : ६५)

पण हे निष्कर्ष केवळ कल्पनेच्या तकलादू पायावर उभे असतील, तर ते निरर्थक ठरण्याची शक्यता असते.

डॉ. रा. चिं. ढेरे लज्जागौरीचा शोध घेताना एक गृहीतक मनात ठेवून रामतीर्थला गेले आणि उंबरणशिल्प बघितल्यावर त्यांच्या मनातील गृहीतक सिद्ध करण्याचा खटाटोप त्यांनी सुरू केला. गृहीतक सिद्ध करताना त्यांनी अनुकूल ठरणारे अनेक पुरावे जमा केले, त्यांची तार्किक वाटावी अशी मांडणीही केली, पण गृहीतकाला प्रतिकूल ठरणारे, आडकाठी करणारे, छेद देणारे जे पुरावे त्यांच्या दृष्टिपथात आले, त्यांकडे मात्र त्यांनी दुर्लक्ष केले. जाणीवपूर्वक की अजाणता, हे सांगता येणार नाही. मात्र त्या पुराव्यांचा संशोधनात त्यांनी वापर केला नाही. 'उंबरण' शिल्पाला लज्जागौरीचे प्रतीकशिल्प मानले; त्या शिल्पाला मातृदेवता, आदिमाता, आनंद-नायिकी, लक्ष्मी समजून त्यांनी तिचे दर्शन घेतले. त्यांच्या मनाचे समाधान झाले. त्यांची शोधयात्रा सफळसंपूर्ण झाली असेल; पण हे सर्व घडताना त्यांच्या कल्पनाविलासाने त्यांच्यातील संशोधकाला अंधारात ठेवले, हे मात्र निश्चित. संशोधकच अंधारात राहिल्यावर वाचकांच्या मनावर कसा प्रकाश पडेल?

**संदर्भ :**

१. श्री. के. जी. उपाध्ये, श्रीक्षेत्र रामतीर्थ-माहात्म्य आणि प्रातःस्मरणीय स्तोत्रे, प्रकाशक - श्री रामेश्वरसेवा समिती - श्री क्षेत्र रामतीर्थ, (दु. आ.), २००५.

२. तारा भवाळकर, संस्कृतीची शोधयात्रा, पद्मगंधा प्रकाशन, पुणे २००५.

३. रा. चिं. ढेरे, लज्जागौरी, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९७८.

४. रा. चिं. ढेरे, श्रीआनंदनायिकी, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००२.

५. विश्वनाथ शिंदे, देवीहोसूरचे संशोधन, ढेरेंचा चकवा, नवभारत, वाई, सप्टेंबर २०१०.

☆☆☆

---

## साभार पोच

१. ***संवाद-आस्वाद*** – मधु जामकर; परममित्र पब्लिकेशन्स, ६, राजदुर्गा, बी, केबिन रोड, नौपाडा, ठाणे (प.) ४०० ६०२; प्रथमावृत्ती - २०१०; पृष्ठे – १२२; किं. रु. १२५/-.

२. ***जरा शहाणे होऊ*** – डॉ. शरद अभ्यंकर; अक्षर मानव प्रकाशन, ९५९ पवनपुत्र, दुसरा मजला, शिवाजी रस्ता, राष्ट्रभूषण चौक, शुक्रवार पेठ, पुणे – ४११००२; प्रथमावृत्ती : २००९; पृष्ठे – १८४; किं. रु. १५०/–.

३. ***बदलती क्षितिजे : भागर*** – सुरेंद्रनाथ कांबळी; ४७१/सी, मनुमहाल, किंग्ज सर्कल, मुंबई – ४०००१९; प्रथमावृत्ती - २०१०; पृष्ठे – २५६; किं. रु. १५०/–.

४. ***फिनिक्सच्या राखेतून उठला मोर*** – जयंत पवार, प्रकाश विश्वासराव; लोकवाङ्मयगृह, भुपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई – ४०००२५; प्रथमावृत्ती : २०१०; पृष्ठे – १७९; किं. रु. २००/–.

५. ***हिंदी चित्रपटगीत : परंपरा आणि आविष्कार*** - अशोक दा. रानडे; पॉप्युलर प्रकाशन, प्रा. लि., ३०१ महालक्ष्मी चेंबर्स, २२ भुलाभाई देसाई रोड, मुंबई – ४०००२६; प्रथमावृत्ती – २०१०; पृष्ठे – ४२२; किं. रु. ४५०/-.

६. ***क्षणिक*** – मंगेश पाडगांवकर; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई – ४००००४; प्रथमावृत्ती – २०१०; पृष्ठे – १०७; किं. रु. ६०/–.

७. ***जगप्रवाह*** – जयराज साळगांवकर; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई – ४००००४; प्रथमावृत्ती – २०१०; पृष्ठे – १२२; किं. रु. १५०/–.

८. ***लवासा*** – निळू दामले; मौज प्रकाशनगृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई – ४००००४; प्रथमावृत्ती – २०१०; पृष्ठे – १५६; किं. रु. १५०/–.

९. ***त्रिदळ*** – वृंदावन दंडवते; मौज प्रकाशन गृह,

खटाववाडी, गिरगांव, मुंबई – ४००००४; प्रथमावृत्ती – २०१०; पृष्ठे – १३४; किं. रु. १२५/–.

१०. ***समाजमनातील बिंब*** – लीना मेहेंदळे; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई – ४००००४; प्रथमावृत्ती – २०१०; पृष्ठे – १२७; किं. रु. १६०/–.

११. ***स्त्रीमिती निवडक 'मिळून साऱ्याजणी'*** – डॉ. नीलिमा गुंडी; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई-४००००४; प्रथमावृत्ती – २०१०; पृष्ठे-४००/-.

१२. ***माझ्या वर्तमानाची नोंद*** – पी. विठ्ठल; गोवा प्रकाशन, अक्षर, ४९ जयनगर, नवीन उस्मानपुरा, औरंगाबाद – ४३१००५; प्रथमावृत्ती – २०११; पृष्ठे – १२२; किं. रु. १२०/–.

१३. ***तीन न्यायमूर्ती आणि त्यांचा काळ*** – नरेंद्र चपळगांवकर; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई – ४००००४; प्रथमावृत्ती –२०१०; पृष्ठे – ३१५; किं. रु. ३००/–.

१४. ***कविभूषण*** – ब. ग. खापर्डे – प्रा. डॉ. पद्मरेखा धनकर – वानखेडे; हरिवंश प्रकाशन, विद्यानगर, गजानन महाराज मंदिर मार्ग, चंद्रपूर –४४२४४०; पृष्ठे – ३५१; किं. रु. ३००/–.

१५. ***काळे पांढरे – अस्फुट लेख*** – अनिकेत जावरे; हर्मिस प्रकाशन, सर्व्हे नं. ६९४, शॉप नं. २, आदर्श को-ऑप. सोसा., सातारा रस्ता, पुणे – ४११०३७; प्रथमावृत्ती – २०११; पृष्ठे – १३१; किं. रु. १४०/–.

१६. ***लोकगायकांची परंपरा*** – प्रभाकर मांडे; गोदावरी प्रकाशन, मंगलप्रभा, १०९, एन्–५ (द) सिडको, औरंगाबाद – ४३१००३; प्रथमावृत्ती–२०११; पृष्ठे– ३९६; रु. ३८०/–.

१७. ***मराठी पत्रकारिकेतील ध्येयनिष्ठ कर्मयोगी*** – गावकरी प्रकाशन, गावकरी भवन, ४३० एच, टिळक पथ, नाशिक–४२२००१; प्रथमावृत्ती–२०१०; पृष्ठे–२६३; किं. रु. २५०/–.

१८. ***कॉ. श्रीपाद अमृत डांगे*** – डॉ. अशोक चौसाळकर; कॉ. गोविंद पानसरे अमृत महोत्सव समिती, रेड फ्लॅग बिल्डिंग, बिंदू चौक, कोल्हापूर – ४१६००२; प्रथमावृत्ती – २०११; पृष्ठे – ५०३; किं. रु. ५००/–.

१९. ***एन.जी.ओ.*** – प्रा. विलास रणसुभे; श्रमिक प्रतिष्ठान, रेडफ्लॅग बिल्डिंग, बिंदू चौक, कोल्हापूर – ४१६००१; प्रथमावृत्ती – २०११; पृष्ठे – १८८; किं. रु. १२०/–.

२०. ***इरलं*** – नीलकांत चव्हाण; सुविद्या प्रकाशन, १४९ शनिवार पेठ, पुणे – ४११०३०; प्रथमावृत्ती – २०१०; पृष्ठे – २३७; किं. रु. २५०/–.

२१. ***कोळसा म्हणाला राखेला*** – नीलकांत चव्हाण; सुविद्या प्रकाशन, १४९ शनिवार पेठ, पुणे – ४११०३०; प्रथमावृत्ती – २०११; पृष्ठे – १०४; किं. रु. १२५/–.

२२. ***हाक निळ्या क्षितिजाची*** – नीलकांत चव्हाण; सुविद्या प्रकाशन, १४९ शनिवार पेठ, पुणे – ४११०३०; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – १४४; किं. रु. १२५/-.

२३. ***कर्मवीरांची मानसकन्या*** – रुपाताई साळवे; सुविद्या प्रकाशन, १४९ शनिवार पेठ, पुणे – ४११०३०; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे – ३८४; किं. रु.४५०/-.

२४. ***भूमीचे मार्दव*** – इंद्रजित भालेराव; मनोविकास प्रकाशन, फ्लॅट नं. ३/ए, चौथा मजला, नारायण पेठ, पुणे – ४११०३०; प्रथमावृत्ती – २०११; पृष्ठे – १९९; किं. रु. १२०/–.

२५. ***साहित्यिक आनंद यादव*** – डॉ. रवींद्र ठाकूर; बळविंश प्रकाशन, नृसिंह पॅलेच्यामागे, नरहरनगर, नांदेड – ४३१६०५; प्रथमावृत्ती – २०११; पृष्ठे – २०८; किं. रु. २००/–.

२६. ***रिबोट*** – जी. के. ऐनापुरे; शब्द पब्लिकेशन, शॉप २, क्रेस अपार्टमेन्ट, बोरिवली (प.), मुंबई – ४०००९१; प्रथमावृत्ती –२००८; पृष्ठे – २१९; किं. रु. २२०/–.

☆☆☆

# लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

-- संपादक मंडळ

अनुक्रमणिका

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून
सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.



अनुक्रमणिका